


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका










टाइप एव्ही १ आणि जेव्ही १
५ ते ७.५ हॉर्स पॉवर



टाइप एव्ही २ आणि जेव्ही १
१० ते १५ हॉर्स पॉवर





टाइप बी ४ ४० ते ४८ हॉर्स पॉवर



टाइप आर ए. हवेनें थंड होणारीं
१७ ते ६४ हॉर्स पॉवर.





अनुक्रमणिका







# दीपावली

साहित्य-कला-संस्कृति



सप्टेंबर : १९६४
वर्ष २० वें
मूल्य १ रु.

## श्रे य ना मा व लि —



दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

ट. नं. ७७७६५

Gram : Dalalart

❋ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु.+ रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.



● Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57



अनुक्रमणिका

## दीपावली

**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनडी ब्रीज, मुंबई ४,

टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यं शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ** दलाल यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# या ! विघ्नहर्त्या गणराया या !

**या ! या !!** विघ्नहर्त्या गणराया या ! वाजत, गाजत, गर्जत या ! मूषकवाहनावरून मिरवीत या ! अर्जुनाच्या रथावर बसून या ! पुष्पकांतून बसून या ! गरुडवाहन घेऊन या ! प्रल्हादाच्या साठीं खांबांतून प्रगटलां तसें खांबांतून प्रगट व्हा ! दाशरथी म्हणून या ! शेषशायी म्हणून या ! 'मदन दहन' करायला या ! तुकयाच्या अभंगातलें "सांवळे तें रूप मनोहर" घेऊन या ! जनीच्या आर्त हांका ऐकून धांवलांत तसें धांवून या ! ह्या साऱ्या रूपांत दडलेलें तें एकात्म रूप आम्हीं ओळखतो. त्या आत्मतत्त्वाची आणि आमची चांगली ओळख आहे. त्याचें आणि आमचें युगायुगांचें नातें आहे. त्या विविध रूपांत साकारलेल्या 'ईश्वरा'चे भक्त म्हणवून घेण्यांत आम्हांला अभिमान वाटत आला आहे. कधीं आम्ही प्रेमानें त्याला गोपाळ म्हणतों तर कधीं महेश म्हणतों. कधीं मंगेश म्हणतों तर कधीं महांकाळ म्हणतो. कधीं लक्ष्मी म्हणून त्या ईशतत्त्वाला आम्ही साद घालतों तर कधीं 'दुर्गा' 'काली' म्हणून त्या तत्त्वांतल्या संहारक शक्तीला पाचारण करतो. पण ह्या तत्त्वांतूनच उत्पत्ति, स्थिति, लय ह्या तिन्ही गोष्टी संभवतात हें आम्ही जाणतों. जगांत अनाचार वाढला कीं, त्या संहारक शक्तीला साद घालावीच लागते. कारण अखेर सत्याला आणि सुंदराला संरक्षण मिळायलाच हवें असते. आणि अमंगल आणि अन्याय्य जें असेल त्याचा विनाशही घडणें आवश्यक असते. परमेश्वरावरची श्रद्धाच सरली तर जीवनांत पोकळी उत्पन्न होण्याची भीति असते. मांगल्यावरची, साधुत्वावरची, सत्यावरची, धर्मावरची, माणसांतल्या देवत्वावरची श्रद्धा मुळासकट उन्मळून पडण्याच्या काळांत सध्यां आम्ही चांचपडत आहोंत !

म्हणून गणराया या ! मंगलमूर्ति गणेशजी या !. विघ्नहर्त्या गणराया या ! गणाधीश या ! उत्साहमूर्ति, उत्सव दैवत बनून या !! आज तुमची कधीं नाहीं भासली इतकी गरज भासते आहे. तुम्ही गणाधीश आहांत. आज तुमच्या नेतृत्वाची गरज आहे. मार्गदर्शनाची गरज आहे. तुमचा उत्सव करायला आम्ही निघालों आहोंत. पण परिस्थितीनें आमचे पायच तोडून टाकण्याचा संकल्प केला आहेसें दिसते आहे. आम्हांला गावेसे वाटते आहे. पण आमचे सूरच कुणीतरी हिरावून नेले आहेत. आम्हांला नाचावेसे वाटते आहे. पण पायांतले चाळच कुणीतरी पळवून नेले आहेत. आम्हांला तुमच्यापुढें फेर धरून टाळ घेऊन तुमचे संकीर्तन करावेसे वाटते आहे. पण टाळच कुणीतरी खसकन् ओढून घेतले आहेत आणि तेच टाळ शस्त्रासारखे आमच्या टाळक्यावर थडाथड येऊन आदळत आहेत. तुमच्या भोंवतींची आरास आमची दयनीय अवस्था पाहून जणुं आम्हांला हंसते आहे. तुमच्या समोरच्या मोदकाच्या ताटांतील मोदक आम्हांला जणुं खिजवीत आहेत. मूषकराज आमच्या समोरून मिरवीत जातात आणि जणुं म्हणताहेत कीं, मी पहा किती सुखी आहे ! भक्ताला हें भाग्य लाभत असते ! बुद्धि आहे. धड शरीर आहे. उमेदीचें मन आहे. अदम्य उत्साह आहे. उदंड महत्त्वाकांक्षा आहे. संकटांवर मात करण्याची जिद्द आहे. उरांत सद्भावना आहेत. 'जगा आणि जगूं द्या' अशी सहानूभूत भावना शेजाऱ्याबद्दल वसते आहे. सर्वांभूती परमेश्वर आहे ही श्रद्धा अजूनही उरांत कायम आहे. आणि तरीही सत्वपरीक्षा चालू आहे. ह्या साऱ्याच श्रद्धांना तडा जाईल कीं काय अशी भोंवती स्थिति नांदते आहे. अखेर यांत जगणार आहे काय ? मरणार आहे काय? अन्याय जगेल आणि न्यायाला फांशी दिलें जाईल ? अधर्माचें अधिराज्य येईल आणि धर्माला दिवाळखोरी पत्करावी लागेल ? असुंदर विक्राळ रूपें घेऊन हारांतून मिरवील. आणि सुंदराला वनवास

(पान ६ वर पहा)





अनुक्रमणिका

—पु. भा. भावे

प्रचंड सोंगट्या मांडून ठेवाव्यात तशीं नुसतीं पर्वत शिखरें दिसूं लागलीं—पाऱ्यानें स्नान केल्या-सारखीं दिसणारीं, बर्फाच्या टोप्या घालून बसलेलीं शेंकडो पर्वत शिखरें! प्रत्येक पर्वत जणुं महाकाय, भस्मचर्चित मुनी होता. तो अमर्याद धवलतेचा देखावा पाहतां पाहतां माडगुळकर म्हणाले——

——त्यासाठींच तर हा लेख वाचला पाहिजे.




# समरभूमि लडाख्

**भारतीय** वायुदलाचें तें विमान झपाट्यानें मार्ग कापीत होतें. मनुष्य वस्ती मागें पडली. रानें आलीं. डोंगरांच्या उतरणींवरचे वृक्ष दिसले. व मग वृक्ष दिसेनासे झाले. प्रचंड सोंगट्या मांडून ठेवाव्यात तशीं नुसतीच पर्वतशिखरें दिसूं लागलीं. पाऱ्यानें स्नान केल्यासारखीं दिसणारीं, बर्फाच्या टोप्या घालून बसलेलीं शेंकडों पर्वतशिखरें. पर्वत-शिखरें आणि दऱ्या. दऱ्या आणि पर्वतशिखरें. हें एक अद्‌भुत जग होतें. लकाकत्या धवल-तेचें जग. प्रत्येक हिमपर्वत येथें स्वत:चेंच तेज परावर्तित करीत होता. प्रत्येक पर्वत हा जणुं एकेक महाकाय, भस्मचर्चित मुनी होता. ठाण मांडून हा मुनीसंघ जणुं येथें तप-श्चर्येस बसला होता. व त्यांच्या तपस्तेजानें दिशा उजळून उठल्या होत्या. वृक्षांची अनुपस्थिति येथें मुळीं जाणवतच नव्हती. क्षितिजापर्यंत पसरलेल्या शुभ्रतेनेंच येथें एक अलौकिक सौंदर्य निर्माण करून ठेवलें होतें. महासागरावर उसळणाऱ्या प्रचंड लाटांप्रमाणें तीं शेकडों पर्वतशिखरें दिसत होतीं. डोळे भरभरून त्या देखाव्याकडे आम्ही पहात होतों.

परतीच्या प्रवासांत हाच देखावा आम्ही पुन्हा एकदां पाहिला. एका मालवाहू 'पॅकेट'मध्यें माडगुळकर व मी कांचेला चेहरे लावून उभे होतों. आमाळांत शुभ्र ढग होते व पायतळीं शुभ्र शिखरें होतीं. ढगांच्या अगणित श्रेणी व शिखरांच्याहि अगणित श्रेणी. शुद्ध रुप्याचेंच आकाश व शुद्ध रुप्याचीच धरित्री. अमर्याद धवलतेचा तो देखावा पाहतां पाहतां माडगुळकर सद्‌गदित कंठानें मला म्हणाले,

"स्वामी, असें वाटतें कीं येथून एकदम खालीं उडी घ्यावी. मरायला यापेक्षां चांगली जागा आणखी कोणती असेल ?" आणि हे शब्द बोलतां बोलतां माडगुळकरांच्या गालां-वरून आसवें ओघळूं लागलीं.

माझीहि अवस्था तशीच कांहींशी झाली होती. अंतराळांतून त्या पर्वतशिखरांकड सूर मारत जाण्याचा मोह मलाहि होत होता. काय चिंता होती ? गंगाधर शंकराची ही भूमि होती. त्या दिव्य सौंदर्यांत विलीन होऊन जाण्यापरतें आयुष्याचें दुसरें सार्थक कोणतें होतें ? त्या सौंदर्याकडे श्वास रोखून आम्ही पहात होतों.

"हा काराकोरम पर्वत. हा सहोदर हिमालयाचाच होता. तो नंगा पर्वत." अंगुलिनिर्देश करून प्रश्नांची वाट न पाहतांच मैत्र महाशय सांगत होते. "आणि ती सिंधू नदी."

सिंधूचें नांव निघतांच पुन्हा आमचें हृदय उचंबळून आलें. खालीं बार्लीसिंधूचा निळसर हिरवा प्रवाह खळाळत होता. हीच ती सुरसेविनी सिंधू. जिचें स्मरण स्तोत्रास्तो-त्रांतून आम्ही करतों. आमच्या पूर्वजांनीं केलें. जिच्या तटावर सहस्रवार मंत्रघोष झाले, हिंदु संस्कृतीच्या पाळण्यानें पहिले झोके जियें घेतले, ती ही सिंधू ! आमची










अनुक्रमणिका

माता, आमची जीवनदायिनी, आमची मानमर्यादा !

"लडाखमध्यें हीं सिंधू आपल्याला दिसेल ना ?" मी विचारलें.

"खूप दिसेल. "We will see quite a bit of Indus there" मैत्र महाशयांनीं उत्तर दिलें.

सिंधू जळाचा स्पर्श करण्याचा निश्चय त्याच क्षणीं मी करून टाकला. गंगास्नान मी केलें होतें. धनुष्कोडीच्या सागर-संगमांतहि मी न्हालों होतों. आतां इच्छा सिंधूंत अवगाहन करण्याची होती.

"ती जोझिला खिंड" मैत्र महाशय पुन्हां बोट दाखवीत होते. जोझिला ! काश्मीरवर "टोळीवाल्यांनीं" पहिलें आक्रमण केलें, तेव्हां येथें युद्ध झालें होतें. रक्त सांडलें होतें. हेच पापप्रेरित टोळीवाले श्रीनगरच्या विमानतळापर्यंत येऊन पोहोंचले होते. काश्मीर खोरें तेव्हां थोडक्यांत वांचलें. मूठभर भारतीय सैनिकांच्या शौर्यामुळें वांचलें. रावळपिंडीपर्यंत तेव्हां आमचे जवान जाऊं शकले असते. आमचे गिलगित आमचेंच राहिलें असतें. काश्मिरचा तुकडाहि तुटला नसता. सैन्याला आत्मविश्वास व ईर्षा भरपूर होती. त्या ईर्षेला विजयी कृतीची ओढ होती. परंतु हा गतेतिहास होता. आज नवा इतिहास घडत होता. इतिहासाची पुनरावृत्ति होत होती. लडाखचा नवा तुकडा चिन्यांनीं तोडला होता. त्याच लडाखच्या दिशेनें आम्ही जात होतों.

"श्रीनगर ते लेह किती अंतर आहे ?" मी विचारलें.

"About Hundred and sixty air miles एकशेंसाठ वायुक्रोशांचें !" मैत्र महाशयांनीं उत्तर दिलें.

"विमानानें तासाभराचा हा प्रवास आहे भुईवरून ह्या प्रवासाला दिवसचे दिवस लागतात. ह्या पर्वतांतून विमान चालविणें कठीण आहे. परंतु आमचे वैमानिक तें काम कौशल्यानें करतात."

मैत्र महाशयांचा चेहरा अभिमानानें फुलला होता. तो अभिमान अतिशय सार्थ होता. आम्ही लोक बुद्धीनें तसे कमी नाहीच मुळीं. वैयक्तिक शौर्य व कर्तृत्वहि आमच्यांत पुष्कळ आहे. आमचें चुकलें आहे तें वेगळेंच ! तें जें कांहीं चुकलें आहे त्यामुळेंच ऐतिहासिक काळापासून आजवर अनकदा आमची अपरंपार हानी झाली. मान-हानीहि आम्हांला अतोनात सोसावी लागली.

आम्ही बोलत होतों, पहात होतों व विचार करीत होतों. हें विमान आमचेंच होतें. सोबत कांहीं जवान व आम्ही पाहुणे प्रवासी. विमानाचे चालक (बहुवा) साने नांवाचे मराठी गृहस्थ होते. ह्या सान्यांचे वडील डॉ. साने, माझ्या थोडचा परिचयाचे होते. वऱ्हाडांतल्या खामगांवचे हे साने. कुठें वऱ्हाड नि कुठें लडाख ! पण ही येथें आमची भेट होत होती. मराठी माणसें व मराठी शब्द अगदीं श्रीनगरपासून आम्हांला भेटले. इतक्या दूर देशाच्या टोंकाला मराठी चेहरे दिसले. व मराठी शब्द ऐकले तेव्हां कांहीं वेगळेंच वाटलें. लडाखमध्येंहि जागोजाग मराठी माणसें आम्हांला भेटत होतीं. एके ठिकाणीं तर "सोनी गल्ली, सीतावर्डी, नागपूर" हा एकेकाळीं पत्ता असलेले फाटक नांवाचे गृहस्थ मला भेटले. पिढ्यान्‌पिढ्या त्यांचा आणि आमचा शेजार होता. अलीकडे ते लडाखमध्यें होते व यदृच्छेनें मीहि तिकडेच चाललों होतों.

पाहतां पाहतां (आणि बोलतां बोलतां) तास संपून गेला. सहस्रावधि फूट उंचीवरून उडणारें विमान खालीं उतरूं लागलें.

"लेह् आलें." मैत्र महाशय म्हणाले. "शरीराचा कुठलाहि भाग आतां उघडा ठेवूं नका. थोडाहि निष्काळजीपणा फार बाधेल." असें म्हणून त्यांनीं माझा तर गळपट्टाहि बांधून दिला.

"पहिले एकदोन दिवस तुम्हांला नीटशी झोप लागणार नाहीं. प्रारंभीं तरी भूकहि नेहमी-प्रमाणें लागणार नाहीं. दम लागेल. थोडचाहि श्रमानें थकवा येईल. मळमळेल. गलबलेल. लेहची उंची अकरा सहस्र फुटांवर आहे. ह्या उंचीची संवय होईपर्यंत प्रमाणाबाहेर धुम्रपान करणें, अधिक बोलणें, श्रम करणें, वर्ज्य मानावें. अंमली पदार्थांच्या सेवनाविषयीं वेगळें सांगायलाच नको." अशा सगळ्या सूचना मैत्र महाशयांनीं आम्हांला श्रीनगरांतच देऊन ठेवल्या होत्या. विमान उतरत असतां पुन्हा त्यांची उजळणी झाली. विमानांत म्हणण्यासारखा त्रास आम्हांपैकीं कुणालाच झाला नाहीं. क्वचित् दम लागे. प्राणवायूच्या नळकांड्या पुढ्यांतच होत्या. मौज म्हणून परतीच्या प्रवासांत त्यांचा उपयोग आम्ही करून पाहिला. ह्या खेपेस

---

(पान ४ वरून)

पत्करावा लागेल ! सत्य, प्रामाणिकपणा, अपार कष्ट ह्यांना निद्रानाश जडेल आणि असत्याला सुखनिद्रा लाभेल? नाहीं ! नाहीं ! ! असें घडणार नाहीं ! घडतां कामा नये ! चांगलं आहे. सुंदर आहे. धर्म्य आहे. स्वीकारणीय, वंदनीय आहे तें तें जगलें पाहिजे ! तें 'जीवन' आहे. आणि तेंच सरलें तर उरेल फक्त शृंगारलेलें कलेवर ! म्हणूनच गणराया या ! विघ्नहर्त्या गणराया या ! विघ्नांची रासच्या रास सध्यां इथें कोसळते आहे. माणसाची जगण्यावरची श्रद्धाच वादळांत सांपडली आहे. कोंवळे कोंभ सुकून चालले आहेत. शृंगाराच्या वयांत शृंगारच जळून जातो आहे. हिरवळ वठून जाते आहे. फळें गळून पडत आहेत. हें सारें थांबविणें तुमच्या हातीं आहे गणराज ! 'विघ्नहर्ता' म्हणून सारें जग आपल्याला ओळखतें ! 'असुर' शक्तींचा विनाश हें तर आपलें जीवित कार्य ! 'मंगलमूर्ति'नें मांगल्याचें वरदान द्यायचें नाहीं तर कुणीं? विनायकानें 'नायकी' करायची नाकारली तर आम्ही कुठें जायचें? कोणतेंही रूप घ्या! कारण ह्या विविधरूपांतल्या एकत्वाशीं आमचें नातें आहे ! त्या विविध रूपांतल्या कार्याचें एकत्वही आम्हांला परिचित आहे. 'दैवी' शक्तीचें संरक्षण–आणि 'असुरी' शक्तीचा विनाश ! आज तें 'संहारक' 'काली'चें रुप घेऊन या ! महामाया 'दुर्गे'च्या सर्व अस्त्र शस्त्रांसह धांवून या ! मदनाला जाळणारा तृतीय नेत्र उघडून या ! आणि 'संप्रति माजलेल्या दानवां'चा संहार करा ! या गणराया या ! "विघ्न-हराया वांचुनि या" ! !

—संपादक






प्राणवायूविनाच आमचे प्राण आनंदांत होते. विमान उतरत होतें. टेकड्यांनीं वेढलेला वशीसारखा भूप्रदेश दृष्टिपथांत येत होता. गांव दिसूं लागलें. ल्हासाच्या लामानिवासाची जणूं प्रतिकृति अशी लामासराई डोळ्यांत भरली. व धुळीनें वेढलेल्या कच्च्या धांवपट्टीवर आमचें विमान टेकलें. शिडीवरून खालीं उतरण्याची कसरत आटोपली. आणि लेह्च्या व लडाखच्या भूमीला दि. २५ दिवशीं सकाळीं आमचे पाय लागले.

मैत्र महाशयांनीं छावणींतून तडक आम्हांला कांहीं कोशार्धावर असलेल्या लेह नगरांतल्या नागरी निवासस्थानांत (डाकबंगला) नेऊन पोहोंचविलें व आमचा निरोप घेतला. लेहमधील आमच्या रहिवासाची सारी व्यवस्था येथें व्हावयाची होती. तसें आश्वासन स्थानिक 'ओव्हरसियरनें' मैत्र महाशयांना दिलें होतें. आम्ही त्या व्यवस्थेची वाटच पहात राहिलों. ह्या व्यवस्थेचा प्रारंभ चहापासून होईल अशी आमची साहजिकच अपेक्षा होती. सकाळपासून तोंड धुण्याचें पाणी तेवढें आम्ही तोंडांत घेतलें होतें. त्याचें मोठेंसें वैषम्यहि आम्हांपैकीं कुणाला वाटलें नव्हतें. परंतु आतां चहा अपेक्षित होता. आम्ही वाट पाहात होतों. पडवींत फेऱ्या घालत होतों. वाटेवरून फिरून येत होतों. घटका जात होत्या, पळें जात होतीं. पण चहा कांहीं येत नव्हता. बराच वेळ माडगूळकरांनीं व मी समोरचे बर्फानें माखलेले डोंगर पहाण्यांत घालविला. मग सफेत्यांच्या सुंदर झाडांचे अवलोकन केलें. एक टोंकदार टोपींतली लडाखी स्त्री व तशाच टोपींतला पुरुष चालू बांधकामासाठीं चिखल वाहून आणीत होता. त्या श्रमिकांचें आम्ही कौतुक केलें. पण चहा, कांहीं येईना.

पुन्हा समोरच्या डोंगराकडे पहात मी माडगूळकरांना म्हटलें, "जरा तिथून थोडा बर्फ तर घेऊन या. पेयांत घालायला उपयोगी पडेल." पण पेय येईना. चहा येईना! चिखलाच्या पाट्या वाहणारे श्रमिक गाण्यासारखे कांहींतरी गुणगुणत होते. मनांत विचार आला, कुठेंहि जा माणसांच्या संवयी सारख्या. श्रम हलके

(पान ५२ वर पहा)











## आम्ही असें लिहितों



# पुरुषोत्तम भास्कर भावे

**लेखकाला** किंवा वक्त्याला 'व्यक्तित्वा'ची (Personality) देणगी असली तर अगदीं दुधांत साखर! परंतु हा योग पुष्कळदां दुर्मिळ असल्याचेंच आढळून येतें. पुरुषोत्तम भास्कर भावे यांच्याबाबत मात्र हा अपूर्व योग जमून आला आहे, असें प्रथमदर्शनीच ध्यानांत येते. कुणीतरी त्यांचं वर्णन मराठी साहित्यांतील एक 'दांडगा' माणूस म्हणून केल्याचं मी नुकतंच ऐकलं. भाव्याच्य व्यक्तित्वाचा इतका समर्पक शब्दांत कुणी परिचय करून दिला असेल असें मला वाटत नाहीं. भावे प्रकृतीनेंहि ठणठणीत आहेत. आणि वृत्तीनेंही रोखठोख आहेत. त्यांच्या व्यक्तित्वाचाच 'समर्थ'पणा त्यांच्या लेखणींतून प्रगट झाला आहे. भावे हे वर-वर पहातां त्यांच्या एकंदर बाह्यरूपामुळें अबोल, संतापी स्वभावाचे, असावेत असा पुष्कळांचा समज होतो. पण भाव्यांच्या सहवासांत तास अर्धातास घालविला कीं, ध्यानांत येतं कीं, हा माणूस दिसतो तसा नाहीं. वृत्तीनें सरळ, स्पष्टवक्ता, मनाचा कोमल, कांहीं मूल्यें मानणारा व मूल्यां-साठीं कांहीं किंमत देण्याची तयारी अस-णारा हा माणूस आहे. भावे यांनीं खूप पाहिलं आहे. खूप सोसलं आहे. आणि वृत्तीची एक प्रकारची समतोलता त्यांना आतां साध्य झाली आहे. जीवनाचा त्यांनीं फार सखोल विचार केला आहे. जीवनांतले जयपराजय पचवूनही "**कलावंत हा नेह-मींच अजेय राहतो. पराभव त्याचा परा-जय करूं शकत नाहीं.**" अशी एक फार मोठी श्रद्धा त्यांनीं संपादन केली आहे कथा, कादंबरी, नाटक, निबंध लेखन, टीकात्मक लेखन, वृत्तपत्रीय लेखन, वोंचरे विनोदी, उपरोधप्रधान लेखन, पटकथा–संवाद लेखन ह्या सर्व प्रकारांत भाव्यांनीं आपली लेखणी चालविली आहे. अग्रक्रम मिळविला आहे. टीका केल्या आणि झेल-ल्याही! कांहीं टीकाकारांच्या मतें भावे आतां संपले आहेत. उलट अरविंद गोखले यांच्यासारखे कांहीं लोक म्हणतात कीं, "**अडीच अक्षरें**" सारखी उत्कृष्ट कादंबरी लिहून भाव्यांनीं कादंबरीचे सर्व सांचे मोडून टाकले आहेत. (ही 'संपल्याची' भविष्यवाणी साहित्यक्षेत्रांत अधुनमधून गर्ज-तच असते. 'संपलेले' लिहित असतात. भविष्य वर्तविणाऱ्याला मात्र अधुनमधून धक्के बस-तच असतात—नव्या व चांगल्या निर्मितीचे) पण भाव्यांचा स्वतःच्या लेखणीवर, वाचकां-वर आणि त्याहीपेक्षां एकूण जीवनावरच फार मोठा विश्वास आहे. जीवनांतल्या सौंदर्यावर, सत्वावर, मांगल्यावर त्यांची श्रद्धा आहे. अनुभव समृद्धपणें घेण्याची जिद्द अजूनही कायम आहे. त्यासाठीं द्यावें लागणारे "मोल"ही देण्याची त्यांची तयारी आहे. आज आपल्या लेखणी, वाणीवर विसंबून जीवन व्यतीत करणारी जी कांहीं साहित्यिक मंडळी मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रांत दिसतात, त्यांत भावे यांचा समा-वेश होतो.

जन्म धुळ्याला झाला असला, शिक्षण नागपुरला झालें असलें तरी भावे आतां धुळेकरही राहिले नाहींत आणि केवळ 'नागपुरी" राहिले नाहींत. नागपूर, पुणें, डोंबिवली याच्या दरम्यान कुठेंतरी ते वाव-रत असतात. डोंबिवली त्यांना आवडत. आतां औद्योगीकरणामुळें त्या गांवचें "स्वरुप" बदलेल म्हणून त्यांना खंतही वाटते. पण अकुलीना, अंतराळ, वर्षाव सारख्या कादं-बऱ्या, कितीतरी चांगल्या कथा, स्वामिनी, पडछायेसारखीं नाटकें त्यांनीं डोंबिवलींतच



अनुक्रमणिका

खास 'दीपावली'साठीं घेतलेल्या साहित्यविषयक मुलाखतींत प्रभाकर अत्रे यांच्याशीं बोलतांना

**श्री. पु. भा. भावे** म्हणाले—

# "कलावंत हा नेहमींच अजेय राहतो. पराभव त्याचा पराजय करूंच शकत नाहीं"

लिहिलीं. भावे भटके आहेत. मागे मुंबईच्या सत्कार प्रसंगीं श्री. पु. ल. देशपांडे म्हणाले होते—"**खूप चालणारे दोन भावे महाराष्ट्रांत आहेत. एक विनोबा भावे आणि दुसरे पु. भा. भावे.**" भटकण्याइतकेंच भाव्यांना अत्तराचें वेड आहे. कधीं फिरायला निघतांना, तर कधी स्थानिक व्याख्यानाला निघतांना सुद्धां भावे स्वतः आधीं अत्तर लावतील आणि आलेल्या माणसालाही "सुगंधी" करून सोडतील. गप्पा इतकेंच सिगरेटचेंही त्यांना वेड आहे. "रात्र सरली, पण गप्पा सरल्या नाहींत" त्या तालावर कधीं कधीं सिगरेटचीं पाकिटें संपतात. पण गप्पा संपत नाहींत. मग डॉक्टर भावे (बंधु) एखादें Emergency पाकीट बाहेर काढतात. खूप हिंडतात तसें खूप वाचतातही. नवें जुनें हा भेद न पहातां वाचतात. नव्या चांगल्याचें स्वागत करतात. कपड्यांचे खास "शोक" त्यांना नाहींत. कपड्यांतल्या विविध रंगीं 'काळजांशीं' त्यांचें नातें आहे. आपले म्हणून म्हटल्यावर मोकळेपणानें चांगले वाईट सांगतील व चांगल्याला संरक्षण देतील. तत्त्वाच्या बाबतींत त्यांना तडजोड ठाऊक नाहीं. पण ह्या तत्त्वकठोरतेनें त्यांनीं आपली रसिकता मात्र मरूं दिली नाहीं. त्यांना जुन्या नाटकांतली गाणीं गुणगुणतांना ऐकलं कीं, मनांत कधीं कधीं प्रश्न उभा राहतो कीं, 'रक्त आणि अश्रू' मधील ज्वलंत लेखन करणारे भावे ते हेच काय? असे अनेक प्रश्न मनांत घोळवीतच मी भाव्यांकडे गेलों आणि मग मुलाखत सुरूं झाली.

*

प्रश्न—— आपल्या लेखनाला आपण सुरुवात केव्हां केली ?

भावे—— शाळेंत असतांनाच केली. 'फुकट' ही माझी गोष्ट मी मॅट्रिकच्या वर्गांत शिकत असतांनाच 'किर्लोस्कर' मधून प्रसिद्ध झाली. गोष्टी, कविता मी शाळेंत असतांनाच लिहूं लागलों. माझ्या वृत्तपत्रीय लेखनाला सुरुवात मात्र मी कॉलेजमध्यें असतांना झाली. प्रा. वि. घ. देशपांडे यांच्या '**स्वच्छंद**' मधून मी प्रथम लिहूं लागलों. तेथून मग मला 'सावधान'च्या मावकरांनीं उचलले. 'स्वच्छंद' साधारणपणें एक वर्ष चाललें. त्यावेळीं मॉरिस कॉलेजांत मुलींचा नाच झाला. त्यावर मी दोन टीकात्मक लेख लिहिले. 'अखेर पोरी नाचल्या' आणि "मॉरिस कॉलेजांत मुलींचा नाच" असे लेख फार गाजले. कांहीं माणसें रागावलीं, कांहीं लोभावलीं.

प्रश्न—— सर्वसामान्यपणें पुष्कळशा लेखकांच्या लेखनाचा प्रारंभ कवितेनें होतो. आपल्या कांहीं कविता आमच्या वाचनांत नाहींत—आपल्या बाबतींत कवितेचा अपवाद मानावा काय ?

भावे—— छे ! छे ! मीही कविता केल्या. कवितांनींच प्रारंभ केला. शाळेंत असतांना मी कविता करीत असे पण माझी छापील अशी एकच कविता आहे.ती गतवर्षी 'श्याम'मध्यें छापून आली. चिनी आक्रमणाचा विषय आहे.

प्रश्न — लेखक म्हणून आपल्या कारकीर्दीला सुरुवात कशी झाली ? पहिला लेख, पहिली कथा कोणती ? आज त्या कथेबद्दल काय वाटते ?

भावे—— पटवर्धन हायस्कूलमध्यें '**तुतारी**' व '**अभिनव भारत**' अशीं दोन हस्तलिखितें काढीत होतों. वयाच्या १५ व्या वर्षी मी "ओम् फस्" नांवाची गोष्ट लिहिली. ती मग मी पुन्हां परत लिहिली व आतां ती "रंगमंच" ह्या नव्या संग्रहांत घातली आहे.

प्रश्न – अशा आपल्याला पसंत न पडलेल्या कथा, बिघडलेल्या कथा आपण पुन्हां लिहितां काय ?

भावे — सहसा नाहीं. पहिल्या प्रथम ही एकच गोष्ट मी पूर्णपणें पुन्हां लिहिली. 'सार्थक' ची मूळकथा इंग्रजी चौथींत असतांना लिहिली. नंतर ती मग पुन्हां लिहिली. बालपणीच्या बिघडलेल्या पांच सहा कथा पुन्हां लिहिणार आहे.

प्रश्न — आपल्याला सुचणाऱ्या कथांची कांहीं टांचणें वगैरे करून ठेवतां काय ?





अनुक्रमणिका

भावे — ठेवतों ! मुद्दे लिहून ठेवतों. येवढंच नव्हे तर कुठें सुचली, कधी सुचली, गांव, कधीं सुरू केली व संपविली हासुद्धां तपशील मी १९४८ पासून ठेवीत आलों आहे. वाचकांचीं पत्रेंही अलीकडे मी मुद्दाम जपून ठेवतों.

प्रश्न— आपण वृत्तपत्राकडे वळलांत तेव्हां आपल्यापुढें कोणते आदर्श होते? सर्वसाधारणपणें प्रारंभ काळीं कोणत्यातरी मोठ्या लेखकाचे संस्कार कळत न कळत आपल्या मनावर परिणाम करतात. आपला अनुभव काय आहे ?

भावे — संस्काराबाबतच बोलायचें झाले तर अमुक एकाच लेखकाचे संस्कार मजवर झाले असें म्हणतां येणार नाहीं. अच्युतराव कोल्हटकरां-सारखे कांहीं लेखन ठरवून केलें आहे. पण चिपळूणकर, गडकरी, सावरकर, तांबे, केशवसुत ह्या लेखक कवींनीं मजवर बरेच संस्कार केले आहेत. कविता मला आवड-तात. मी वाचतोंही ! शिवाय वायकांच्या पोथ्यांचा संस्कार मला मिळाला आहे. आमच्या घरीं पोथी वाचणाऱ्या ऐकणाऱ्या वायकांचा अड्डा होता. त्या श्रव-णाचा संस्कारही माझ्या मनावर झाला आहे. लहानपणापासून संस्कार मी घेत आलों.



प्रश्न — "आदेश", "सावधान"मध्यें आपण सर्व एकटाकी लेखन करीत होतां असें आम्ही ऐकलें आहे. खरं आहे काय ते ?

भावे — खरं आहे. विविध सदरें लिहिलीं. एकटाकी लिहिलीं. सिनेमा परिक्ष-णेंही लिहिली आणि राजकीय लेखही लिहिलें.

प्रश्न — ही कारकीर्द साधारणतः किती वर्षांची होती ?

भावे — एक तपाची ! सावधान साडेपांच वर्षे व आदेश साडेसहा वर्षे.

प्रश्न — ह्या वृत्तपत्रीय कामगिरींत मह-त्वाची कामगिरी कोणती ?

भावे — पुष्कळ लिहिलं आहे. त्यांतलं कांही 'रक्त आणि अश्रूं'त आलं आहे. अजून बरंचसं यायचं आहे. स्वतःचें वृत्तपत्र गेल्यावर मग गॅप्स पडायला लागल्या. प्रभाकर पाध्ये 'धनुर्धारी'त असतांना मी मुंबईवर बारा लेख लिहिले होतें. ते अजून एकत्र प्रसिद्ध झालेले नाहींत. याशिवाय **तिमिर स्तोत्र, ही पहा नागव्या स्त्रियांची रांग, अश्वारूढ आर्यांचें युद्धगीत, हा पहा तुमच्या देशाचा नकाशा** इत्यादि चांगले लेख लिहिलें आहेत. ह्या साऱ्यांचे संग्रह निघणें आहे.

प्रश्न — गांधीवधानंतर "पत्रकार भावे" ही भूमिका सुटली असली तरी मुळांत ती भूमिका आपल्याला आवडत असावी असें मला वाटतें.

भावे — तुमचें म्हणणें बरोबर आहे. मला ती भूमिका आवडते. पण स्वतःचें वृत्तपत्र नसल्यानें मला ती वठवितां येत नाहीं. मला पटकथा–संवाद लेखनही फार आवडते. खरं म्हणजे विविध प्रकारचें लेखन करायला मला आवडते हेंच खरें !

प्रश्न — आतां पटकथा लेखन आवडते असं तुम्ही म्हणालांत. पुष्कळांचा त्या क्षेत्राबाबतचा अनुभव फारसा चांगला नाहीं. उत्तेजक तरी निदान नाहीं. अपला काय अनुभव आहे ?

भावे — ज्या ताकदीचे लेखक आपल्याकडे आहेत; त्या ताकदीचे दिग्दर्शक आपल्याकडे त्या प्रमाणांत नाहींत. बंगालच्या चित्रपट सृष्टीला एक शरदुबाबू वर्षानुवर्षे पुरतो. पण आपल्याकडे असें घडत नाहीं. कारण समज कमी पडते. अणि 'स्वातंत्र्य' (Liberties) घेण्याची प्रवृत्ति अधिक दिसून येते. लेखका-प्रमाणें दिग्दर्शकालाही वाचन, मनन, प्रवास ह्या गोष्टी अतिशय आवश्यक आहेत, पण तेथेंच नेमके आपले दिग्दर्शक कमी पडतात. साधनांपेक्षां समज कमी पडते असें माझें मत आहे.

प्रश्न — पटकथा लेखन आपण स्वतंत्रपणें करतां ?

भावे — 'सौभाग्य'ची पटकथा फक्त मांड-गुळकरांबरोबर लिहिली. बाकी साता जन्माचा सोबती, माझा होशिल कां, संभाजी वगैरे स्वतंत्र-पणें लिहिल्या आहेत.

प्रश्न — पटकथा लेखकानें सेटवर उपस्थित राहणें फायद्याचें असते काय ?

भावे — सेटवर त्यानें अवश्य उपस्थित रहावे. तें फायद्याचें असते. त्यानें समज मात्र बाळगावी, हट्ट, आग्रह ठेवूं नयेत. म्हणजे मग सारें सुरळीत होते. "**माझा होशील कां**" ची पटकथा जशी लिहिली तशी घतली गेली नाहीं, अन्यथा तो चित्रपट आणखी वर जाऊं शकला असता असें मला वाटतें. सुरंगा खिडकींतून प्रत्यक्ष उडी मारते असें लिहिलें होतें. पण स्वातंत्र्य घेतलें गेलें; समज कमी पडली व त्याचे व्हायचे तेच परिणाम झाले.

**( पान ५५ वर पहा )**



ताजा चहा,
स्वादिष्ट चहा, उत्तम चहा

# टाटा-फिन्ले
## चहा

*अप्रतिम चहा आहे!*

टाटा-फिन्ले चहा खास पॅकबंद पुड्यांतून व डब्यांतून मिळत असल्यानें तो नेहमींच ताजा असतो.

टाटा-फिन्ले चहांत अगदीं निवडक अशीच पत्ती वापरली असल्यानें आपल्याला नेहमीं स्वादिष्ट सुवासयुक्त चहा मिळतो.

टाटा-फिन्ले चहा काळजीपूर्वक मिश्रित केलेला असतो. त्यामुळें आपल्याला नेहमीं कडक व उत्तम चहा मिळतो.

**टाटा-फिन्ले** *चहा प्या;*
*चहाचा खरा आस्वाद घ्या!*








....तुपाळ शरीर.... मचाळ नजर....आरस्पानी चेहरा ....गुल्छडी हात ....कण्हेरीच्या पाना-सारखीं लांबसडक बोटं.... शिंकाळ्याप्रमाणें लांब-लचक केस....वासनेचा हिंदकळणारा, फेसाळ-णारा डोह....थबथबणारा असा अनावर होणारा मोह....

—सदानंद सामंत



**टांगलेल्या** प्रेतासारखी दुपार अचेतन टांगली आहे. हवा थिजली आहे. उजवी भुवयी घामानें भिजली आहे. भावना सुजली आहे. वासना कुजली आहे.

मृणाल बाळंतपणासाठीं माहेरीं गेली आहे.

मी खुर्चीवर बसलों आहे. समोरच्या टिपॉयर मृणालचं पत्र पडलं आहे. बाजूला पत्ते विखुरलेले आहेत. जवळच्याच ॲश ट्रेंत एक अभागी सिग्रेट मन्द मन्द जळत आहे. बागेंतील अशोक वाऱ्याच्या मन्द झुळुकीनं शिरशिरत आहे. टांगलेल्या घड्याळांतील डुलणाऱ्या लंबकावर लक्ष गेलं कीं कित्येक शतकं तरीं मृणाल येणार नाहीं असं वाटत आहे. पारतंत्र्यांत मृत्यु येणार हें माहित असूनहि पिंजऱ्याच्या गजावर चोंच मारणारा पोपट या शांततेंत मला वैरी भासत आहे.

घरांत शांतता आहे. ट्रॅन्झिस्टर रेडियोसारखी जवळ असणारी मृणाल घरांत नसल्यामुळें घर कसं सुनं सुनं भासत आहे. घरांतील भयाण शांतता कांहींतरी वेडंवाकडं दर्शवित आहे. मृणालला अपघात .किंवा मृणालची प्रेतयात्रा किंवा वेडाच्या भरांत नाहींशी झालेली मृणाल..

किती घातकी विचारांनीं मी माझ्या मृणालला जखडून ठेवलं ! नुक्ती कुठें ती स्वप्न–साफल्याच्या वेदीवर आहे.•नुक्ती कुठें मातृ-पदाची नांदी होत आहे. नुक्तीच कुठें कूस उजवली आहे–वांझ-पणाचा वडवानळ नुक्ताच कुठें शमला आहे. कुशींत बाळ अन् डोळयांत स्वप्न ! दुधानें भरलेले स्तन अन् मातृपदाच्या जाणिवेन तुडुंबलेलं मन ! आतां कसलीच उणीव नाहीं. आतां कसलीच तक्रार नाहीं. आतां कुठलाच मनोदय नाहीं. आतां कुठलाच मनोरथ नाहीं. सफल झालेली इच्छा अन् फलद्रुप झालेली वांच्छा!

मग आतां कशी दिसत असेल मृणाल ? माहेरला जातांना ती ओढग्रस्त अन् चिंताग्रस्त दिसायची. हातांत हात घेतला कीं विनसलेल्याप्रमाणें चेहरा करायची. नजरेला नजर दिली कीं बावटळींत





अनुक्रमणिका

सांपडल्याप्रमाणें चेहरा करायचीं. मुलगा होणार कीं मुलगी होणार असा प्रश्न विचारून तिचे गाल थोपटले असतां मात्र....ती मृणाल....ओढलेला चेहरा....ओथंबलेले स्तन.. वाढलेलं पोट... पायाच्या वर येणारं नेसणं....सुजमट वाटणारे पाय.

त्याच मृणालचं आज येथं अस्तित्व नसल्यामुळें माझं मन भरकटत आहे. विकृत, विषारी विचारांनीं माझं मन तरकटत चाललं आहे. अन् मग एकाएकी वाटत आहे कीं माझं मृणालशीं लग्नच झालं नसावं. ती माझी कुणीच नाहीं. मृणालचे मंगल-मणी अन् माझं भाग्य. .अन् मग असं वाटलं कीं माझ्या मृणालशीं मीं द्रोह केला म्हणून माझं मन लसलसत आहे, आंतल्या आंत मुसमुसत आहे.

खरोखरच एका गोष्टीचं गूढ वाटत आहे मला. कुठली कोण इंदूरची मन्दाकिनी ××× कर माझ्या घराची स्वामिनी होते, या घरांत वावरते, संसार-स्वप्नें फुलविते अन् दूर कुठें तरी गेली कीं ध्यास लावण्यास भाग पाडते.

जीवनाचा अर्थच मला लागेनासा झाला आहे. म्हणूनच मला जगावं असं वाटत आहे. तरी देखील एक प्रश्न या क्षणीं मला डिवचतच आहे. लग्नापूर्वी कधींही न पाहिलेली, केव्हांही स्वप्नाळलेली ही स्त्री कोण ?. माझ्या जीवनांत येते, मला व्यापून टाकते, सेवारत होते, अधिकार गाजवून घेते, दररोज कुंकु लावतांना

जीवनाचा, ऋणानुबंधाचा, भेटीचा अर्थ लागेनासा झाला आहे. अन् मृणालची आळवणी विकोपाला चालली आहे. मग आजच तिची एव्हढी आळवणी कां ? सुखरूपपणें बाळंत झाल्याचं आजच पत्र आलं म्हणून ही आळवणी असावी. तिची विनधोकपणें झालेली सुटका पहिल्याप्रथम पुत्राचं दान. पौरुषत्वाची फडकलेली पताका

मला या क्षणीं मृणाल सुखरूपपणें बाळंत झाली म्हणन हर्ष होत आहे. अन् ती जवळ नाहीं म्हणन दुःख पण होत आहे. बातमी आनंदाची आहे. पण विरह गळफांस लावणारा आहे. त्यामुळें आज कसं चुकल्याचुकल्यासारखं वाटत आहे. शरीरावर ॲसिड पडून जळल्यासारखं वाटत आहे. शरीरावरचा कोडाचा डाग मोठा होत जात आहे असं देखील कांहीं तरी वाटत आहे. त्यामुळें मी मृणालच्या दर्शनासाठीं लग्नाच्या आल्बमचा आश्रय घेत आहे. या आल्बमांत तिचीं विविध रूपं चित्रित झालीं आहेत. लग्न-घरांत गोंधळलेली ...होमाभोंवतीं माझ्या मागून थरकत थरकत फिरणारी....माळ घालतानां चैत्र-पौर्णिमेच्या चंद्राकडे पहावं तशी माझ्याकडं पहाणारी...अहेर स्वीकारतांना मला लगटून बसणारी....

कशाला उगीचच त्या आठवणी !....

रागानें मी तो आल्बम् बंद करत आहे. लग्नांत घातलेल्या बोटांतल्या आंगठीशीं चाळा करत बसलों आहे. सिग्रेट जळून खाक झाली आहे. टिपॉयवर पडलेलं मृणालचं पत्र डोळ्यांना खुपत आहे. त्या पत्रांतील अक्षर न् अक्षर जवळजवळ माझं पाठ झालं आहे. "जेवणाखाण्याची आबाळ करूं नका पासून ते बाळाचें नांव काय ठेवायचं" यापर्यंतचा मजकूर मला खुणावीत आहे. कुठलं तरी नवीन नांव ठेवावं याचा विचार चालला आहे. नवीन नांव. उच्चारतांना त्या नांवाचा विचका उडतां नये. नांव घेतल्यावर मृणाल डोळ्यासमोर उभी राहिली पाहिजे.

एकेक नांव सुचत आहे. 'कुणाल' हें नांव मनांत घिरट्या घालत आहे. कुणाल म्हणून हांक मारल्यावर मृणाल धांवत पुढें येणार आहे. कुणाल अन् मृणाल ? कुठलंहि नांव उच्चारलं तर काळीज क्षणभर थरथरत राहणार आहे. मृणालच्या जपांत आतां कुणालचं नांव गुंफलं पाहिजे. आतां या घरांत एकाची भर.... पाळणा .....काजळ ..दुपट्टीं....आंघोळी सपात्या...दृष्ट.. ताईत .बाळाची रडारड ..मृणालची उडणारी तारांबळ बाळाच्या हाताच्या मिठलेल्या मुठी स्तन चुरुचुरु चोखणारे जुळे ओंठ. तो या घरांत रांगणार. येथेंच दुडदुडणार. येथेंच कुठें तरी तो पडणार, आदळणार अन् मग मृणालचं आपल्यावरील प्रेम विभागणार. मृणालचे बाळाकरितां हपापलेले डोळे .तो दृष्टीआड झाला असता तिच्या मनाची घालमेल होणार... तो आजारी पडला असतांना तिची आलोचन जाग्रणं होणार...... तिचे अश्रु....तिची तडफड ...अन् मग आपल्यावरील प्रेमाचा विळखा हळुहळू सैल होत जाणार.......

मृणालचं माझ्यावरचं प्रेम कमी होईल हा विचार सहन होत नाहीं म्हणून सिग्रेट ओढण्याची मला तल्लफ येत आहे. म्हणून सिग्रेटचं पाकीट आणण्यासाठीं मी गॅलरींत जात आहे. सरावा-प्रमाणें सहजच समोरच्या बंगल्यांत माझं लक्ष जात आहे. मृणालची मैत्रिण शांतिबेन झोपाळयावर बसली आहे....तुपाळ शरीर...मधाळ नजर...आरस्पानी चेहरा .गुल्छडी हात...कण्हेरीच्या पानासारखीं लांबसडक बोटं....शिकाळयाप्रमाणें लांबलचक केंस....वासनेचा हिंद-कळणारा, फेंसाळणारा डोह....थबथबणारा असा अनावर होणारा मोह.

मी माझ्या घरांत मृणालबरोबर शांतिबेनला अनेकदा पाहिलं असूनहि पहिल्याप्रथमच तिच्याकडे पहावं असं मी तिच्याकड पहात आहे. क्षणांत मृणालची कोमेजलेली प्रतिमा....बाळाची विझ-लेली आठवण...क्षणभरच...नंतर मला तिला ओरडून सांगावं असं वाटतं कीं मृणालला मुलगा झाला. मृणाल आई झाली पण माझा कंठच फुटत नाहीं. मृणालनें मला सांगितलेले शब्द एकदम आठवतात... शांतिबेन भावनाशून्य आहे... शांतिबेनचं स्त्रीत्व ..अरेरे ! शांति-बेनचं शरीर कुणाला नाकारतां येण्याजोगं पण नाहीं अन् कुणाला स्वीकारतां येण्याजोगं पण नाहीं....भावनाशून्य मढं.... दुस-ऱ्याच्या भावनांना उत्तेजन देऊन स्वतः मात्र भावनाहीन .दुस-ऱ्याच्या वासना विस्तवासारख्या तप्त करून स्वतः मात्र .बंगल्याचं नांव विश्व-दर्शन नवरा इस्ट आफ्रिकेंत व्यापार करून पैसा सांठवतो आहे. अन् ही इकडे एकटी विनाकारण जगून वय सांठवत आहे. दुसऱ्यांच्या नजरेला जर्जर करून फुकटचं जगणं ....मानस-शास्त्र मेलेल्या भावना... गाडलेल्या वासना...ऐन तारुण्यांत बसलेला

अनुक्रमणिका

मर्मांतिक धक्का . . . एखाद्या महान स्वप्नाचे डोळयादेखत झालेले तुकडे तुकडे. . . . . .निनांवी भूमिका . . .

मी काळवंडून मागें फिरत आहे. सिग्रेट पेटली आहे. झुरके सोडलेल्या धुरांत साऱ्या विश्वाची चिंता अन् साऱ्या विश्वा-विषयीची बेफिकीरी जळून जात आहे. तरी देखील मृणालच्या आठवणींचीं वेटोळीं गच्च गच्च होतंच आहेत. मृणालच्या नजरेचा वेढा अधिकाधिक दृढच होत आहे. मृणालचीं हास्य-लकेर, मृणालचे बोल, मृणालच्या पावलांचा होणारा भास मला जखडून ठेवत आहे. केवढी मृणालचीं ही जबरदस्त मोहिनी !

या वियोगाच्या अवधींत मन चळलं नाहीं कीं ढळलं नाहीं... एखाद्या वेश्येकडे छुमछुमणारी रात्र. . .एखाद्या छटेल बाईकडे कुस्करलेली उशी. . .एखाद्या ओळखीच्या बाईकडे आर्जवी नजर. सगळं मला शक्य होतं. पैसा होता. मोका होता, तडफ होती. धडक होती, रूप होतं, धाडस होतं. पण वाटत रहायचं अन् डांचत पण रहायचं कीं कुठल्यातरी बाईच्या शृंगारांत बरबटवून घेतलेल्या हातांनीं मृणालच्या शरीरावर रेघ ओढायची नाहीं, रांगोळी घालायची नाहीं. मग त्या प्रणयांत कांहींच स्वारस्य नाहीं अन् रहस्य पण नाहीं. खेळांतल्या भुसा भरलेल्या मांजरास आंजारण्या-गोंजारण्यासारखं तें होईल. म्हणून माझीं तिकडं पावलं वळलींच नाहींत. आतां त्या मोबदल्यांत मृणालची स्मरण-मणी ओढण्याची एकतर्फी पाळी. मृणाल दूर माहेरीं अन् कुठल्याही स्त्रीच्या आहारी न गेलेला मी मृणाल लवकर येण्याची वाट पहात बसलों आहे.

मृणाल जवळ असतांना चन्दनाची उदवत्ती जवळ लावली आहे असं वाटत असे. मृणाल जवळ असतांना दिवसाला दुपार नव्हती; रात्रीला पहांट नव्हती. नेहमीं उधाणलेली भावना. बहुरूपी वासना. ऋतु बदलत होते पण आम्ही दोघं तशींच होतों. वेळ जात होता पण आम्हीं दोघं तशींच होतों. आकाश रंग पालटत होतं पण आम्हीं दोघं....अन् एकाएकी एका रात्रीं लागलेली चाहूल... ....मृणालचं खुंटलेलं बोलणं.... आळसटलेली शरीराची हालचाल मन्द चाल..... ढळत चाललेला तोल..... अन् नंतर पेटलेला विरहाचा वैशाख वणवा ! त्या वणव्यांत भाजून निघालेली ही वास्तु. या वास्तुंत भूतासारखा वावरणारा मी. स्वतःच्या घराची स्वतःच्या डोळयांनीं दैना पहात दिवस कंठणारा मी..... तुळशीपुढें निरांजन नाहीं; देवघरांत दिवा नाहीं. दिवसा स्वास्थ्य नाहीं; रात्रीं झोंप नाहीं. दिवस-रात्र मृणालचं चिन्तन. हंसऱ्या तोंडानें मृणाल परत येते कीं नाहीं याचा लागलेला घोर........ अन् या लागलेल्या घोरांतच मृणालची मदमस्त आकृति तयार होत आहे, रसरसलेली अन् मुसमुसलेली अशी.... शरीराची नवीन नवलाई.... अवयवांची गोलाई..... दिप्तीमान चेहरा.... तृप्त भोळे डोळे.... ओढाळ ओंठ.....पुनर्जन्म झालेली मृणाल....मध्यन्तरीच्या ताटातुटीनंतर वासनेची पुनर्वसाहत करण्यास आतुरलेली मृणाल अशा या ढांसळत चाललेल्या सांजवेळीं काय करत असेल कोण जाणे ! .....बाळाची काढून टाकलेली दृष्ट.... गुलामाचं नाक अगदीं ह्यांच्या वळणावर गेलंय् असं पुटपुटणं.... उंबरठयावर उभी राहून माझी मार्ग-प्रतिक्षा..... माझ्या आठवणींनीं डोळे भरले असतां धुपाच्या धुरानं डोळयांत पाणी आलं ही खोटी सबब......

रात्र चढत चालली आहे. हातांतील सिग्रेट विझत चालली आहे. निःशब्द बोल गळयांत दाटत आहेत. मृणालच्या वियोगाची वेलांटी दीर्घ दीर्घ होत चालली आहे. अन् मात्र मनाच्या थारोळयांत झोंपाळयावर बसलेल्या शांतिवेनची हुबेहूब अशी विश्व—वेदनेची करुणरम्य प्रतिमा !

●●●







अनुक्रमणिका




—जयवंत दळवी

# मोरू ही पहा आमची मुंबई



मुंबईला इतिहास आहे. पण इतिहासाच्या पुस्तकांत गोंधळ नाहीं. मुंबईला 'भूगोल' आहे. 'दीज् बॉंबे पीपल्' म्हणून त्यांचा उल्लेखहि कधीं कधीं केला जातो. ह्या बहुढंगी, बहुरंगी मुंबईचें हवामानहि असेंच विनोदी आहे, रंगेल आहे, बहुढंगी आहे. इथें सारे अंदाज आणि साऱ्या ज्योतिषांचीं भविष्यें कोलमडतात. . . .

त्याचेंच तर हे खदखदां हंसविणारे, चिमटे काढणारे, क्वचित प्रसंगीं 'फाजील' वाटणारे पण 'रसपूर्ण' वर्णन....वाचा आतां !

**मामा** ! मुंबईच्या या प्रखर उष्णतेला तोंड देण्यासाठीं म्हणून मुंबईकरांसाठीं खास थंड हवेचीं ठिकाणें राखून ठेवायला हवींत असें नाहीं का तुम्हाला वाटत ?

मोरू ! खंडाळा, लोणावळा वगैरे हिल-स्टेशनें मुंबईकरांसाठींच आहेत. उन्हाळयांत तेथें जाऊन रहाणारीं माणसें मुंबईचीच असतात. आमच्यासारख्या बाकीच्या मंडळीसाठीं खुद्द मुंबईलाच हवेचीं कांहीं ठिकाणें आहेत. त्यांत सर्वांत उंचीचें ठिकाण म्हणजे मलबारहिल. त्याच्या खालोखाल उंचीचें ठिकाण म्हणजे ज्याची त्याची गच्ची. गच्चीवरील पाण्याच्या टाकीवर् जाऊन स्वस्थ बसावें. त्याशिवाय बागा, उद्यानें, मैदानें आणि चौपाटया हीं ठिकाणें मोकळीं असतात. या ठिकाणीं जाऊन आम्ही थंड हवा खाण्याचा प्रयत्न करतों. अर्थात् तेथेंहि खूप गर्दीच असल्यामुळें थंड हवा खाणें तर सोडाच पण आहे ती हवासुद्धां थंडपणें खातां येत नाहीं. तथापि त्याहि परिस्थितीवर आम्ही आमच्या सोशिकपणामुळें मात करूं शकतों. चौपाटी, शिवाजी पार्क किंवा मलबारहिल येथें रमत गमत जाऊन आम्ही मोकळ्या हवेंत फिरल्याचें सोंग करू शकतों. रात्रीं पुन: घरीं येतांना थेट हिलस्टेशनवरूनच परत येत असल्याचा बहाणा आम्हाला जमतो. येतांना क्वचित खिशांत चार दिडक्या असल्या तर मोगऱ्याचा गजरा (आधीं तिच्या डोक्यांत आणि मग—) आमच्या मनगटांत खेळवून आम्ही शुष्क जीवनांत थोडी रसिकता आणूं शकतों. समोरच्या इमारतींतला गुजराती शेठिया (दंगलीच्या वेळीं रणछोडदास असला तरी)-यावेळीं स्वत:ला कन्हैयालाल समजून झोपाळयावर 'पोतेनी शेठाणी साथे' झोके घेतो. त्याचा आम्ही हेवा करतों. आणि आपल्याहि खोलींत तसा एखादा हिंदोळा टांगता येईल कीं काय हें पहाण्यासाठीं आम्ही मोठ्या अपेक्षेनें छपराकडे पहातों. पण मोरू, तुला आश्चर्य वाटेल ! अखेर वर्षानुवर्षे छपराकडे पहात आम्ही आमची हयात घालवतों.

अशा या उन्हाळयांत आम्हाला 'मॅन ऑन द् स्ट्रीट' या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या माणसाचा राहून राहून हेवा वाटतो. हीं माणसें खरीं सुखी ! फूटपाथवर पथारी पसरून हीं माणसें जेव्हां रात्रीं सुखानें झोपतात तेव्हां आम्ही बिछान्यांतले ढेकूण मारीत बसलेलों असतों. कितीहि फवारे मारा, मुंबईचे ढेकूण कांहीं कमी होत नाहींत. याचा एक फायदा असा होतो कीं आमच्या बायका हिऱ्याच्या कुडया मागत नाहींत. कारण 'ढेकणासंगें हिरा तो भंगला' हें संतवचन त्यांना माहीत असतें.

यामुळें, मोरू, अनेकदां हा घरंदाजपणा नकोसा वाटतो. एक चटई घेऊन फूटपाथवर जाऊन पडावेसें वाटतें. पण फूटपाथवर पडणें हें घरंदाज माणसाला शोभणारें नसतें.

पण मामा, वाऱ्यासाठीं विजेचे पंखे लावायला काय बरें हरकत आहे ?

मोरू ! हरकत कशाची? विजेचा पंखा घेण्याचा आमचा निर्धार असतोच पण पुठ्ठ्याचा एक आणेवाला पंखा अधिक बरा





अनुक्रमणिका

वाटतो. कारण त्या पंख्यानें वारा घेतां घेतां 'वेडेकर मसालेवाल्यांकडे' काय काय मिळतें तेंहि कळतें. वाऱ्याच्या आनंदाबरोबर व्यावहारिक ज्ञान मिळालें तर त्यांत काय वाईट ?

मामा, किमान वाळयाचा पंखा—

अरे काय करायचा वाळयाचा पंखा ? येथें वाळयाचे पंखे मिळतात त्यांत वाळा थोडा आणि नारळाची शेंडी फार ! त्यापेक्षां पुठ्ठयाच्या पंख्यानें वारा घेतां घेतां 'जा-जा-जा, घेऊन ये वाळयाचा पंखा' असें गाणें गुणगुणलें तर पुठ्ठयालासुद्धां वाळयाचा वास येतो.

आणि दुसरें असें— आम्ही वाळयाचा किंवा पुठ्ठयाचा पंखा आणायचा आणि सौभाग्यवतीनें तो शेगडीला वारा घालण्यासाठीं वापरायचा. म्हणजे मग शेवटीं राहिलें काय ? त्यापेक्षां आपलें सकाळचें वर्तमानपत्र काय वाईट ? वर्तमानपत्र हालवून वारा घेतला तर त्याचें पौंडी वजन कमी होत नाहीं. त्यामुळें रद्दींतहि घट होत नाहीं. असो.

मोरू ! मुंबईतल्या वाढत्या उष्णतामानावर अशी मात करीत करीत आम्ही जूनचा पहिला आठवडा गांठतों. यावेळीं कांहीं ठराविक ज्योतिषी वर्तमानपत्रांत लेख लिहून पाऊस कधीं पडणार याचें भविष्य वर्तवतात. पाऊस पडणें, न पडणें हें नक्षत्रांवर अवलंबून नसून आपल्या भविष्यावर अवलंबून असते असा त्यांचा जबर आत्मविश्वास असतो. त्यांचीं भविष्यें वेगवेगळीं असतात. पाऊस पडण्याच्या तारखासुद्धां प्रत्येकाच्या वेगळया वेगळया असतात. त्याचा फायदा असा होतो कीं, कुठल्या तरी तारखेला पाऊस पडतोच — पडलाच पाहिजे. त्यामुळें निदान एकाचें तरी भविष्य खरें होतें. सर्वांनीं एकच तारीख दिली असती तर सर्वांचेंच भविष्य चुकलें असतें. त्यामुळें निदान एकाचें तरी भविष्य खरें ठरतें आणि मुंबईकरांचा ज्योतिषशास्त्रावरचा विश्वास टिकून राहतो.

शेवटीं कुणाच्या तरी तारखेनें कां होईना, पण एकदांचा पाऊस पडतो. वास्तविक पाऊस पडला कीं पावसाळा सुरू झाला हें साधें सत्य नाहीं काय ? पण आमच्या वेधशाळेला तें पटत नाहीं. या फक्त प्रारंभीच्या सरी आहेत, हा मॉन्सून किंवा पावसाळा नव्हे असें विनदिक्कतपणें वेधशाळा सांगत असते. पण सुदैवाची गोष्ट ही कीं त्या भाकितावर विश्वास न ठेवतां मुंबईकर माळयावर चढतात. मोरू, ओघानेंच आलें म्हणून सांगतों — मुंबईच्या खोल्यांतला माळा ही एक अजब चीज आहे. अलिकडे खुद्द खोल्याच माळयासारख्या दिसूं लागल्यामुळें या माळयाला पोटमाळा असेंहि म्हणतात. या पोटमाळयावर काय असेल आणि काय नसेल हें सांगतां यायचें नाहीं. डालडाचे रिकामे डबे, खाली बाटल्या, बंबाच्या मोडक्या चाळणी, छत्रीचे सुटे तीर, आंब्याचा खाली करंडा, देवदारी खोके, सुंभाचें गुंडाळें — एक का दोन ! थोडक्यांत सांगायचें म्हणजे माणसें आणि रोजची स्वयंपाकाची भांडीं खेरीज करून इतर गोष्टी माळयावरच असतात. कांहीं ठिकाणीं जागेच्या टंचाईमुळें कांहीं जोडपी माळयावर झोपतात. अशा माळयावर छत्र्या ठेवलेल्या असतात. पावसाच्या पहिल्या सरी पडल्या कीं मुंबईकर माळयावर चढतात आणि छत्र्या काढतात. त्या छत्र्यांत खंडीभर झुरळें असतात. तीं घरांत पडूं नयेत म्हणून छत्र्या गॅलरींत उभें राहून उघडण्याची येथें प्रथा आहे. त्यामुळें झुरळें रस्त्यावर पडतात.

पण मामा, हीं झुरळें रस्त्यावरून जाणाऱ्या लोकांच्या अंगावर पडतील ना ?

पडत असतील ! पण अंगावर पडलेलें कांहींहि झटकण्याची त्या लोकांना संवयच असते. गॅलरींत छत्री उघडली कीं उघडया छत्रींतून समोरचें आकाश दिसतें. तें दिसलें कीं आकाश फाटलें नसून छत्री फाटली आहे याची जाणीव होते आणि अंगाला घाम फुटतो. मुंबईकरांना हा एक आणखी भुर्दंड!

मोरू ! हा भुर्दंड सोसून मुंबईत छत्री ही सज्ज ठेवावीच लागते. कारण मुंबईत पाऊस फार पडतो. विशेषतः तो रविवारीं अख्खा दिवस कोसळतो. त्यामुळें "मेला सुट्टीच्या दिवशीं कोठें हिंडू फिरूं देणार नाहीं !" अशी तक्रार मुंबईकर गृहिणी करीत असते. आणि मुंबईकर पुरुष खूप होऊन मनांतल्या मनांत हंसत असतो. मोरू ! मुंबईच्या पावसांत एक आर्थिक द्वंद्व भिजावें हें काव्यमय नाहीं असें कोण बरें म्हणेल ?

मोरू ! मुंबईत पाऊस सुरू झाला कीं मुंबईच्या रस्त्याखालीं गटार असावेत याची मुंबईकरांना जाणीव होते. कारण 'गटार




"बरं का, कवितेचें शीर्षक आहे चोरावर मोरं !"


अनुक्रमणिका

तुंबले' हा शब्दप्रयोग मुंबईकर पावसाच्या चार महिन्यांत वारंवार वापरत असतो. असें गटार तुंबलें कीं मुंबईतले खुष्कीचे मार्ग बंद पडतात आणि जलमार्ग सुरू होतात. त्यांतहि कधीं कधीं पाऊस जोरदार पडतो. यालाच आम्ही संवयीनें मुसळधार पाऊस म्हणतों. तसें म्हणशील तर आम्ही मुसळें कधींच पाहिलेलीं नाहींत. (त्यामुळेंच आम्हाला दुसऱ्याच्या डोळ्यांतलें कुसळ दिसतें, पण मुसळ दिसत नाहीं ! ) तथापि संवयीनें आम्ही या पावसाला मुसळधार पाऊस म्हणतो. असा पाऊस पडला कीं सगळीकडे पाणीच पाणी होतें. अशा वेळीं मुंबई एके काळीं बेट होतें याचा साक्षात्कार होतो. पूर येणें, लोंढा येणें वगैरे शब्दांतला थोडा फार अर्थ आम्हाला यावेळीं कळतो. बऱ्या बऱ्या मोटरी, टॅक्सी इंजिनांत पाणी शिरून बंद पडतात. बसगाड्या गटारांच्या कडेला थंड पडलेल्या असतात. आगगाड्या वेळेवर येत नाहींत (म्हणूनच वेळेवर जातहि नाहींत.) मोरू, अशा वेळीं आम्ही ऑफिसला दांड्या मारतों. कारण यावेळीं दांडी मारायला पावसाचें सांगण्यासारखें कारण असतें. इतर वेळीं आम्ही दांड्या मारतों तेव्हांचीं कारणें न सांगण्यासारखीं असतात. अशा रीतीनें वाहतूक विस्कळीत होते तेव्हां मुंबईतली व्हिक्टोरिया तेवढी ऐटीनें दौडत असते. यावेळीं हे व्हिक्टोरियावाले भरपूर पैसा घेतात. पावसाळा हा एकच त्यांचा पैसा करण्याचा हंगाम असतो. तथापि पावसांत ही व्हिक्टोरिया झांकून आंतल्या उतारूंना गुडुप करण्याच्या प्रथेमुळें आंत प्रेमाचे उत्तान चाळे विनबोभाट करतां येतात. त्यामुळें तरुण जोडप्यांना (तसे म्हातारे सुद्धां कांहीं स्वस्थ बसणारे नव्हेत ! ) ज्यादा भाडें देणें परवडतें !

मोरू ! अशा पावसांत मुंबईकरांचीं पोरें क्रियाशील होतात. याच पाण्यांत ती पोहण्याची कला शिकून घेतात. शिवाय जलमार्गावर वाहतुकीचें मुख्य साधन म्हणजे होड्या हें पोरें शाळेंत शिकलेलीं असतात. आपल्या शालेय ज्ञानाचा या एके ठिकाणीं हीं पोरें योग्य उपयोग करून घेतात. त्यामुळें जागोजाग कागदाच्या होड्या पाण्यावर तरंगतांना दिसतात.

मोरू ! मुसळधार पाऊस पडला कीं जिकडे तिकडे पाणी तुंबतें. पाणी तुंबलें कीं वाहतूक विस्कळीत होते. हें सारें आम्ही पहातों. पण मुसळधार पाऊस पडला, पाणी तुंबलें किंवा वाहतूक विस्कळीत झाली असें म्हणण्याचा आम्हाला धीर होत नाहीं. दुसऱ्या दिवशींच्या वर्तमानपत्रांत पाणी तुंबल्याचा, पोरें पाण्यांत पोहोतानांचा किंवा वाहतूक विस्कळीत झाल्याचा फोटो येतो. कांहीं वर्तमानपत्रांत तर एकच फोटो दरवर्षी येत असतो. कारण, दरवर्षी तेंच पाणी त्याच तऱ्हेनें तुंबलेलें असतांना फोटो तरी दरवर्षी नवीन नवीन कशाला काढायचा ? फुकटचा ब्लॉकचा खर्च ! पण तो फोटो कालचा असो अथवा दहा वर्षांपूर्वीचा असो, तो आजच्या वर्तमानपत्रांत आला कीं काल खूप पाऊस पडला होता असें म्हणायला आम्ही मोकळे होतों. असा फोटो पाहिला कीं "असा पाऊस आम्हीं कधींच जन्मांत पाहिला नव्हता." असें आपले म्हातारे सालाबादप्रमाणें पुनः एकदां सांगतात.

आतां तूं तुलनेनें म्हणशील तर, मोरू, मुंबईत कितीहि पाणी तुंबलें तरी तें दिब्रुगडच्या मानानें कमीच ! खरें म्हणशील, तर आसामांतलें हें दिब्रुगड गांव आयुष्यांत एकदां बघायची इच्छा आहे. पावसाळ्याला जोर चढला कीं दिब्रुगड पाण्याखालीं बुडलें

अशी वातमी आलीच. दर पावसाळयांत हें दिब्रुगढ किमान चार–पांचदां तरी चार चार दिवस पाण्याखालीं असतें. आणि तरीहि पुढल्या वर्षी पुनः बुडण्यासाठीं पुनः घरादारासह अस्तित्वांत येतें हें एक नवलच नव्हे काय ? आणि तरीहि तें गांव 'टुरीस्ट सेंटर' झालें नाहीं हें सुद्धां केवढें आश्चर्य ?

तथापि या दिब्रुगढसारखें मुंबई शहर पाण्याखालीं बुडलें नाहीं तरी वारा आणि पाऊस यांच्या माऱ्यामुळें कांहीं ठिकाणच्या इमारती धडाधड कोसळतात. कांहीं माणसें मरतात. कांहीं जखमी होतात आणि बाकीचीं निर्वासित होतात. पण त्यांची कांहीं ना कांहीं सोय केली जाते. कारण निर्वासितांची सोय लावणें हा सांप्रतचा मुख्य भारतीय उद्योगधंदा असल्यामुळें तें सहज शक्य होतें. इमारती कोसळतात अनेक ठिकाणीं–पण त्यांतल्या त्यांत फोरासरोड, कामाठीपुरा, मुगभाट हीं ठिकाणें याबाबतींत अधिक प्रसिद्ध आहेत.

अशी इमारत कोठेंहि पडली कीं आपले महापौर, कांहीं मंत्री त्या जागीं फोटोग्राफर-सह हजर होतात. आणि पहाणी करतात.

मामा, पण या पहाणीचा उपयोग काय?

मोरू ! आसामांत पूर आला कीं आपले पंतप्रधान नाहीं कां विमानांतून पहाणी करीत ? त्या पहाणीचा जेवढा उपयोग होतो तेवढाच महापौरांच्या आणि मंत्र्यांच्या पहाणीचा होतो. त्यांच्या पहाणीचा उपयोग काय होतो हें पहाण्यापेक्षां आपले महापौर आणि मंत्री हे कर्तव्यदक्ष असतात म्हणून त्याचें आधीं कौतुक करायला नको काय ? अरे मोरू, त्यांची कर्तव्यदक्षता निःसंशय वाखाणण्यासाठीं असते. अरे, अनेकदां हीं माणसें पाऊस खूप पडला नाहीं तर बेचैन होतात. कधीं एकदांची अतिवृष्टी होते आणि कोसळलेल्या घरांची पहाणी करायला जातों असें त्यांना झालेलें असतें.

पण मामा, हे लोक नेहमी फोटोग्राफर कां बरोबर नेतात ?

हा वेडया ! अरे फोटोग्राफर सोबत नसेल तर महापौर आणि मंत्री तेथें गेले होते याला पुरावा काय ? लोकांना तें कळणार कसें ?

पण तेथें जाऊन ते करतात तरी काय ?

स्टडी ऑन द् स्पॉट ! जागच्या जागीं पहाणी ! जुनी इमारत पावसामुळें कोसळली हें माहीत असूनहि ती कशामुळें कोसळली याची चौकशीसुद्धां सुरू केली जाते.

पावसामुळें इमारती पडण्याची वाट न पाहतां, महापालिकेनें जुन्या इमारती पाडल्या पाहिजेत असें सुचविणारे वृत्तपत्रांचे अग्रलेख तयार असतात. अनेकदां हा मजकूर मे महिन्यांतच लिहून, कंपोज करून तयार असतो. पण पावसाळयांत एखादें दुसरें घर कोसळतांच ते अग्रलेख तात्काळ प्रसिद्ध होतात. यामुळें नागरिकांच्या सुखसोयीसाठीं वृत्तपत्रें किती दक्ष असतात हेंच नाहीं का स्पष्ट होत ?

मोरू ! या पावसाळयासंबंधीं मुद्दाम सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे पाऊस पडत असतांनाचीं रस्त्यावरील दृश्यें फार आकर्षक असतात. रस्तोरस्तीं तुंबलेल्या पाण्यांतून बंद न पडलेल्या मोटरी जेव्हां नेटानें जातात तेव्हां दुतर्फा पाण्याचीं कारंजीं उडतात. पाणी हें मुख्यत्वें गटारांतलें असल्यामुळें तें स्वाभाविकच रंगीबेरंगी असतें. त्यामुळें तीं कारंजीं मोठीं रमणीय दिसतात.

मध्येंच वाऱ्यामुळें (आणि हा नेहमींच सोसाटयाचा असतो) लोकांच्या छत्र्या उडतात. उडतात न उडतात तोंच उलटया होतात. छत्र्यांचे तीर वर सटकतात. त्यावेळीं छत्र्या मिटून घेण्यासाठीं लोक जी झटापट करतात ती सुद्धां पहाण्यासारखी असते. मोरू, तसें म्हणशील तर छत्री उघडून घेतल्यानें लोक भिजत नाहींत असें नाहीं. ते भिजायचे ते यथासांग भिजतातच. तथापि आपण पूर्णपणें भिजलों आणि भिजत आहों हें माहीत असूनहि डोक्यावर छत्री धरण्याचा आमचा अट्टाहास पहाण्यासारखा असतो. पुरुष भिजतातच. त्यांत तेवढें नवल नाहीं. ते घामानें सुद्धां भिजतात. आणि अगदीं क्षुल्लकशा कारणानेंहि त्यांना घाम फुटतो. पण पावसाळयांतलें खरें आकर्षण म्हणजे ओलेत्या स्त्रिया ! रस्त्यांतून सुंदर आणि तरुण स्त्रिया जेव्हां भिजत जातात तेव्हां तें दृश्य मोठें रमणीय वाटतें. 'अंगें भिजलीं जलधारांनीं' हें पद तूं ऐकलें आहेस ना ? त्या पदाचा अर्थ यावेळीं कळतो. सुंदर स्त्रिया पावसांत भिजल्या म्हणजे बऱ्या दिसतात असें मुरब्बी लोकांचें म्हणणें आहे. आणि म्हणूनच अनेक बायका मुद्दाम भिजत फिरतात. इतरेजनांच्या नेत्रांना सुख लाभावें म्हणून त्यांना असें फिरावें लागतें, भिजावें लागतें. त्या स्त्रियांची ही समाजसेवा प्रशंसनीय नाहीं असें कोण बरें म्हणेल ?

मोरू ! या पावसाळयांत रस्तोरस्तीं विनोद सुद्धां घडतात. कांहीं बायका भरमसाट जाड असतात. लायब्ररींतल्या 'हूज हू' या ग्रंथराजासारख्या त्या दिसतात. त्यांत बायकी ढंग नसतो. पण मूलतः त्या बायकाच असतात हें त्यांना (आणि इतरांना सुद्धां) विसरतां येत नाहीं. म्हणून आपलें बायकीपण सिद्ध करण्यासाठीं त्यांना





अनुक्रमणिका

लेडीज् छत्र्या घ्याव्या लागतात. त्या इवल्याशा छत्र्यांत सुका राहिलाच तर त्यांचा अंबाडा ! (म्हणजे तरी काय ? गंगावनच ! ) बाकी त्यांचें सारें अंग पावसानें झोडपून निघालेलें असतें. 'झोडपून' हा शब्द आम्ही पुरुषांनींच लावलेला. म्हणजे तेवढाच आपला सुप्त आनंद ! अशी एखादी भिजलेली बाई घसरूनहि खाली पडते, आणि चौफेर पाणी उसळते. पण तिला उठवण्यासाठीं हात देण्याची भल्याभल्यांची हिंमत होत नाहीं.

हे सारे प्रकार पावसाळ्यांत रस्त्यावर घडतात. आणि जीवनांतून ओसरत चाललेल्या शृंगाररसांत कांहीं क्षण तरी 'भिजतात'. तसे ते भिजावेत अशी येथील सर्वच लोकांची (त्यांत बायकाहि आल्याच--) इच्छा असते.

पावसाळ्यांतील दोन पथ्यें मात्र येथें पाळायची असतात. जे लोक तीं पथ्यें पाळत नाहींत ते पुरे पस्तावतात. या ऋतूंत सार्वजनिक सभांना किंवा चातुर्मासांतल्या कीर्तनाला छत्री घेऊन जाणें धोक्याचें असतें. तेथें जातांच फक्त 'परमार्थ'च साधला जातो. कारण तेथें छत्री हमखासच गहाळ होत. तसेंच या दिवसांत रस्तोरस्तीं कुत्र्यांचे घोळके दिसतात. ते कुत्रे आपली छत्री बघायला जमले आहेत असा आपला समज होतो आणि आपण गाफील रहातो. मग मध्येंच एखादा कुत्रा संतप्त होऊन अंगावर येतो. अशा वेळीं अंग चुकवून पळ काढणें हितावह असतें. चार चौघे आपलें शौर्य पहातील म्हणून छत्री कुत्र्यावर मारली की संपलेंच ! कुत्रा जातो जिवानिशी आणि छत्रीचा दांडा गोतास काळ म्हणण्याची पाळी येते.

शेवटीं पावसाळा संपतो. त्याची मुदतच चार महिन्यांची असते. पावसाळा संपतां संपतां आपले पाण्याचे तलाव भरून वाहूं लागतात. ते भरून वाहत आहेत अशी वर्तमानपत्रांत बातमी आली कीं आम्ही मुंबईकर खुपीनें हंसतो. मुंबईकर गृहिणीला तर चुलीवरल्या तपेल्यांतलें दूधच उतूं जात आहे असें वाटतें. आणि ती चुटपुटून म्हणते, "च् च् च् ! अरे असें उतूं जातें आहे तर नळांतून तरी सोडा म्हणावें !"

असें होतां होतां पावसाळा संपतो. मग निसर्गक्रमानें हिवाळा येतो. मुंबईचा हिवाळा मोठा गंमतीचा असतो. या ऋतूंत हवा मोठी थंड असते असें नाहीं. पण या ऋतूंत घामाच्या धारा ओघळत नाहींत म्हणून या ऋतूला उन्हाळा म्हणतां येत नाहीं, आणि पावसाच्या धारा वाहत नाहींत म्हणून पावसाळा म्हणतां येत नाहीं. म्हणून या ऋतूला आम्ही हिवाळा म्हणतो. नाहीं म्हणायला मध्येंच कधीं तरी आठ दिवस थोडी थंड हवा पडते आणि गार वारा वाहतो. (हवा खेळूं लागली कीं त्याला वारा म्हणतात हें तुला माहीत असेलच ! ) अशा वेळीं कांहीं उतार वयाचे पुरुष लोकरीचा लांब ओव्हरकोट चढवून, हातांत मोजे घालून आणि गळ्याला मफलर गुंडाळून फिरायला निघतात. यावेळीं 'इन् दोज ओल्ड डेज्' अशी सुरवात करत ते इंग्लंडांतील थंडीचें विवेचन करतात. अशा वेळीं ते थंडीचा 'कोल्ड' आणि थंडीच्या लाटेचा 'कोल्ड वेव्ह' असा उल्लेख करतात. हीं माणसें बहुधा बॅरिस्टर असतात किंवा आय्. सी. एस्. च्या परिक्षेंत घोड्यावरून (अकस्मात्) पडल्यामुळेंच नापास झालेलीं असतात. (तथापि आपण चालू आय्. ए. एस्. पेक्षां खूप बरे असा त्यांचा दावा असतो.)

अशा थंडींत बायका बहुदा वेगवेगळ्या रंगाच्या शाली पांघरून रस्तोरस्तीं फिरत असतात. आणि खुद्द थंडी विसरून एकमेकांच्या शालीच न्याहाळीत असतात. प्रत्यक्षांत, थंडीचें निवारण व्हावें यापेक्षां आपली शाल दुसऱ्या बाईनें पहावी एवढाच या बायांचा उद्देश असतो.

यांत खरी आबाळ होते ती मध्यम वर्गातील पुरुषांची. विशेषत: कारकून आणि शिक्षक. त्यांना नेहमीच्या अंगाचा साधा कोट सुद्धां परवडत नाहीं. त्यामुळें बडा ओव्हरकोट परवडेल असें म्हणण्यांत काय अर्थ आहे ? त्यामुळें ते कोण्या एकेकाळीं लग्नाच्या वेळीं शिवलेला कोट बाहेर काढतात. त्यांतली एक पँट वापरून शेवटीं एका वाटीसाठीं बोहारणीकडे गेलेली असते ! तो कोट तसा विटलेला असतो (विशेषत: मालकाला ! ). लग्नानंतर सुटलेल्या अंगाला तो बसतहि नाहीं. त्यामुळें थंडीच्या निमित्तानें तो कोट परिधान करतांच बिचारा पुरुष 'होल्डॉल' बांधल्यासारखा दिसूं लागतो. कांहींच्या बायका तर अधिक उत्साही असतात. कुठल्यातरी क्लासमध्यें



अनुक्रमणिका

जाऊन त्या नवीन वीण शिकून येतात. (संततिनियमनाच्या प्रसारामुळें 'ती' वीण थांवलेली असते !) मग त्या वीणेचा नवीन स्वेटर विणतात. वास्तविक क्लासच्या दोन महिन्याच्या फीमध्यें तयार (आणि चांगला) स्वेटर आला असता. वायकोच्या हातचा स्वेटर म्हणजे लोकरीची खरी नास-धूस असें नवऱ्याचें प्रामाणिक मत असतें. पण तें बोलून दाखवता येत नाहीं. कोंडमारा होतो.

मामा, बोलून तोंडावाटें त्यांना हवा सोडतां येत नाहीं म्हणून ती कोंडून या नवऱ्यांची तव्येत फुग्यासारखी फुगत असेल का ?

मोरू ! तसें म्हणतां येणार नाहीं; कारण तसें असतें तर वायकांची तव्येत तरी कां वरें फुगावी ? त्यांचीं तर तोंडें चोवीस तास उघडींच असतात.

मामा, स्वेटर हें नांव कुणी दिलें ?

स्वेटर हें नांव कुणी दिलें याची कल्पना नाहीं. पण तो महापुरुप हा असाच मध्यम-वर्गीय असला पाहिजे. मोरू, स्वेट म्हणजे घाम, आणि स्वेटर म्हणजे घाम आणणारें साधन. स्वेटर या नांवानें आपल्या वायका जी तीन भोकांची नळकांडी विणून देतात ती अंगांत चढवण्याआधींच नुसत्या कल्पनेनें पुरुषांच्या अंगाला घाम सुटतो. त्यामुळें स्वेटर हें नांव समर्पक नाहीं का वाटत ? तथापि येथील थंडींत कांहीं अभागी पुरुषांना वायकोनें विणलेला स्वेटर अंगांत घालावाच लागतो. त्याशिवाय त्यांची सुटका नाहीं.

मोरू ! या लोकांशिवाय मुंवईंत पाटीवाले हातगाडीवाले, भिकारी किंवा तत्सम लोक खूप आहेत. थंडीचें निवारण करण्यासाठीं या लोकां-कडे कोट, शाली किंवा स्वेटर असतील अशी अपेक्षा करतां येत नाहीं. पण तरीहि भर रस्त्यांत उघड्यावर पडून सुद्धां ते थंडीपासून आपला बचाव करतात. पहिली गोष्ट म्हणजे आंतून रक्त गरम करण्यासाठीं ते हातभट्टीचें थोडें पेय घेतात.

मामा, हें कोणतें पेय वरें ?

मोरू ! हा दारूचा एक प्रकार आहे. त्यासंवंधीं आपण पुढें वोलूं. या पेयामुळें अंगांत ऊव येते एवढेंच तूं आतां लक्षांत ठेव.

अंगांत ऊव आणण्याचा या गरीव लोकांचा दुसरा मार्ग म्हणजे शेकोटी. रस्त्याच्या कडेला गवत पेटवून हे लोक

## हें ओळखा पाहूं ?

शेपूट तुटलेल्या कोल्ह्याची गोष्ट तुम्ही ऐकली असेल. आतां शेपूट तुटलेल्या गाढवाची गोष्ट ऐका.

एक होतें गाढव. त्याचें शेपूट तुटलें. कसें तुटलें तें मला माहीत नाहीं. तुटलें एवढें खरें. कदाचित् त्याला माहीत असेल म्हणून मी त्याला विचारलें,

"कारे बाबा, तुझं शेपूट कसं तुटलं ?"

त्यानें नुसतें 'हूं–हॉं–हॉं–' केलें.

म्हणजे काय तें मला समजलें नाहीं. असो.

शेपूट तुटल्यामुळें तें बेचैन झालें. काय करावें त्याला सुचेना. पाठीवर वसलेल्या माशा त्याला हांकलतां येईनात. त्याला जीव नकोसा झाला.

मग त्यातें एक युक्ति केली. काय युक्ति केली तें ओळखा पाहूं.

(ओळखतां न आल्यास पान २८ पहा.)

शेकोटी करतात आणि ऊव घेत समोंवार वसतात. या शेकोटीसाठीं वहुधा व्हिक्टोरिया-वाल्यांचें गवत उपयोगी पडते. व्हिक्टोरि-याच्या मागल्या दोन चाकांमध्यें गोणपाटाची पिशवी लोंवत असते. तींत गवत असतें. तें गवत लंपास करून हे लोक शेकोटी करतात. व्हिक्टोरियावाला हा सुद्धां श्रम-जिवीच मनुष्य. (तो व्हिक्टोरियावर वसतो म्हणजे कांहीं इंग्लंडचा वादशहा नव्हे !) पण नित्य समाजवादाची घोषणा कर-णाऱ्या या मुंवईंत एक श्रमजिवी दुसऱ्या इसमास लुबाडण्यास कमी करीत नाहीं. तथापि यामुळें समाजवादी सिद्धान्तांत मुंवईकरांनीं भर घातली असें कोणी म्हणत नाहीं याचा खेद होतो.

मोरू ! अशा थंडींत कोणाचे खरेखुरे हाल होत असतील तर ते येथील म्हाताऱ्या लोकांचे ! शिवाजीपार्कसारख्या कांहीं ठिकाणीं रोज नेमानें (आणि कळप करून) फेऱ्या मारणें हा त्यांचा नित्याचा कार्यक्रम असतो. पण कडक थंडी पडली म्हणजे मग खंड पडतो. त्यांना थंडींत वाहेर पडणें कठीण होतें. (विशेषत: वसवलेल्या कवळ्या फार आवाज करतात !) त्यामुळें घरांतल्या घरांत किंवा स्वत: भोंवतीं फेऱ्या मारून त्यांना स्वत:चें समाधान करून घ्यावें लागतें. स्वत: भोंवतीं फिरून काशीला जाऊन आल्याचा वहाणा हिंदु धर्मविधींत जसा करतां येतो तसाच हा प्रकार आहे. हे म्हातारे घरच्या घरीं (घेरी येणार नाहीं अशा वेतानें) स्वत: भोंवतीं फिरतात. आणि पुन: "उभ्या हयातींत अशी थंडी पाहिली नव्हती !" असें दरवर्षीप्रमाणेंच म्हणतात.

[क्रमश:]

एक न–नाट्य

दि. श्री. कराडकर

# आगीला लागली आग!

[गेल्या अंकांत सुरू झालेल्या ह्या नवनाट्य नाटिकेंत केळकर कुटुंबाच्या तिरकस कौटुंबिक वादविवादामुळें श्री. व सौ. दाते यांना बराच वेळ बाहेर तिष्ठत रहावं लागलं आणि अंत आल्यावर ते दोघे नेमकी एकमेकांची ओळख विसरलें, हा सगळा नव–नाटकी गोंधळ चित्रित झाला होता. त्यानंतर काश्या ह्या गोंधळांत सामील झाल्यावर काय घडतं तें पुढें वाचा……]

काश्या : वसंत आणि तारा आतां सुखाच्या क्षणांत आहेत आणि म्हणूनच कांहींहि ऐकण्याच्या ते पलीकडे गेले आहेत. आतां तुम्हांला म्हणून मी एक गुपीत सांगतों. अहो, वसंत हा वसंत नाहींच मुळीं आणि तारा ही तारा नाहींच मुळीं आणि हें मी तुम्हाला सिद्ध करून दाखवतों. ज्या मुलीबद्दल वसंत बोलत होता ती ताराची मुलगी नाहीं. आतां वसंतच्या मुलीचा ताराच्या मुलीप्रमाणें एक डोळा लालबूंद व एक पांढरा आहे. हें सगळं कबूल. पण खरी मेख अशी आहे कीं वसंतच्या मुलीचा उजवा डोळा लाल आहे व डावा डोळा पांढरा आहे, तर ताराच्या मुलीचा डावा डोळा लाल आहे व उजवा डोळा पांढरा आहे. म्हणजे ह्या दोघांमध्यें गफलत झाली आहे. वसंताला वाटतंय् ही तारा, आणि ताराला वाटतंय् हा वसंत. मग खरा वसंत कोण ? आणि खरी तारा कोणती ? जाऊं द्या झालं, आपल्याला काय करायचं आहे ह्यांच्या लफड्यांत पडून ? जे जे घडले ते ते पाहूं. (जाऊं लागतो व दरवाजांतून पुन्हां परत येतो) हो ! माझं खरं नांव शेरलॉक होल्मस्. अर्थात् गांवढळ धनंजय आहें हं. बरं आहे. झुरका मारून येतो.

[जातांना मोठ्यांदा ओरडतो– जागते रहो……त्याच्या ओरडण्यानें श्री. व सौ. दाते दचकतात व एकमेकांपासून दूर होतात श्री. व सौ. केळकर, 'कोण ओरडलं?' म्हणून मागें बघतात. रंगभूमीवर प्रकाश.]

सौ. केळकर ओहोहो, तुम्ही ओरडलांत हो ?

श्री. केळकर आम्ही आपलें ह्या खिडकींतून तुमची वाट बघत होतों. (खुर्चीवर बसतात) दमलों बुवा !

श्री. दाते क्षमा करा हं. आम्हाला थोडा उशीर झाला.

सौ. दाते आम्ही लवकरच येणार होतों.

सौ. केळकर मग कां नाहीं आलांत ? अहो, आम्ही तुमची दुपारपासून वाट पहातों आहोंत.

श्री. दाते पण आम्ही तुमच्या घराभोंवती दुपारपासून फिरतोंय्.

सौ. केळकर : म्हणजे ?

सौ. दाते अहो तुमच्या घरांत शिरण्यासाठीं आम्हाला दारच सांपडत नव्हतं.

सौ. केळकर : मग बेल वाजवायचींत !

श्री. केळकर दरवाजा सांपडत नव्हता तर बेल कशी वाजवतील ? बेल दरवाज्यावर असते.

सौ. केळकर तुम्ही गप्प बसा हो !

श्री. केळकर राह्यलं !

सौ. केळकर मग तुम्हाला दार कसं सांपडलं ?





अनुक्रमणिका

श्री. दाते आम्हाला दार नाहीं सांपडलं पण तुमचा नोकर सांपडला.

सौ. दाते आणि तोहि संध्याकाळीं.

श्री. दाते त्यानेंच आम्हाला मघांशी इथें आणलं.

सौ. केळकर वसा, वसा अगोदर.
(तिघहि वसतात).
काय घेणार ? चहा कीं कॉफी ? आणि पोहे खाणार का ?

श्री. दाते आम्ही मघांशीच खाल्लं. चहाहि प्यायलों.

श्री. केळकर अं ? दुपारपासून तुम्ही आमच्या घराभोंवती फिरत होता आणि आमच्या घराभोंवती तर कुठेंच हॉटेल नाहीं, मग तुम्ही खाणार कुठून ?

सौ. केळकर तुम्ही गप्प वसा हो.

श्री. केळकर : राह्यलं !

सौ. केळकर मग खरंच कांहीं नको ?

सौ. दाते अगदी खरंच कांहीं नको.

श्री. दाते मला थोडा चहा चालेल.

सौ. दाते तुम्ही चहा घेणार असाल तर मी पण थोडा घेईन.

श्री. केळकर : मग आम्हालाहि थोडा हवा.
(दारावरील वेल वाजते)

सौ. केळकर कोण आलं ?

श्री. केळकर काश्या असेल !

सौ. केळकर काश्यानें आयुष्यांत कधीं वेल वाजवली आहे ? उद्धट आहे मेला, सरळ आंत यतो.

श्री. केळकर मग कोणी नसेल.

सौ. केळकर कोणी नसेल काय ? मग वेल कोणी दावली ? कोणी तरी नक्कीच आहे. थांवा मी वघतें. (जातात. दरवाजा उघडतात पण लगेच वंद करतात.) कोण्णी नाहीं. (जागेवर वसतात.)

श्री. दाते आज दुपारीं गंमत झाली. आम्हाला एक मनुष्य भेटला.
(वेल वाजते)

श्री. केळकर मला वाटतं तोच तुम्हाला इथें आतां भेटायला आलेला दिसतोय्.

सौ. केळकर थांवा मी वघतें. (जातात. दरवाजा उघडतात पण लगेच वंद करतात.) कोण्णी नाहीं. (जागेवर वसतात)

श्री. दाते : हं, तर मी काय सांगत होतों.......

श्री. केळकर तुम्हाला एक मनुष्य भेटला.

श्री. दाते येस् !
(वेल वाजते)

श्री. केळकर पहा, पुन्हां वेल वाजली.

सौ. केळकर मी दार उघडायला आतां जाणार नाहीं.

श्री. केळकर : पण वेल वाजली त्याअर्थी कोणीतरी आलं आहे.

सौ. केळकर पहिल्यांदा वाजली तेव्हां कोणी नव्हतं. दुसऱ्या वेळींहि कोणी नव्हतं, मग आतांच कोणीतरी आलं असेल हें कशावरून ?

श्री. केळकर वेल वाजली म्हणून.

सौ. दाते हें पटत नाहीं.

श्री. केळकर वा ! वेल वाजते तेव्हां निश्चितच कोणीतरी आलेलं असतं. दार उघडलं जावं म्हणूनच वेल वाजवली जाते ना ?

सौ. दाते पण हें असं नेहमीच घडतं असं नाहीं. कधीं कधीं दारांत कोणी नसतं ? मघांशी वघितलंत ना ? वेल वाजली पण कोणी नव्हतं.

श्री. दाते पण वहुधा कोणी न् कोणी असतंच. त्याशिवाय वेल वाजेल कशी ?

श्री. केळकर वरोवर आहे. आतां माझंच उदाहरण घ्या. मी जेव्हां कोणाकडे जातों तेव्हां दारावर वेल असेल तर निश्चित-पणें ती वाजवतों. उद्देश काय ? तर कोणीतरी दार उघडून मला आंत घ्यावं.

श्री. दाते Correct. पुढें.

श्री. केळकर म्हणजेच माझं म्हणणं असं आहे कीं जेव्हां जेव्हां म्हणून वेल वाजते, त्या त्या प्रत्येक वेळीं दरवाज्याशीं कोणीतरी असतोच असतो !!

सौ. केळकर म्हटलं तुमचं तत्त्वज्ञान पुरें. प्रत्यक्षांत काय घडलं तें वघितलंत ना ?

सौ. दाते अगदीं वरोवर हो ! Mr. Kelkar, you are defeated.

श्री. दाते (श्री. केळकरांना) वघितलंत ? ह्या वायका शेवटीं एक व्हायच्या.







अनुक्रमणिका

सौ. केळकर : वरं, वरं. वायकांना नको एवढीं नांवं ठेवायला. मी जातें पुन्हा आणि बघतें. (जातात. दरवाजा उघडतात पण लगेच बंद करतात.) बघितलंत ? झाली खात्री ? कोणी नाहीं. (जागेवर बसतात) हे पुरुष मेले निष्कारण बायकांना छळतील.

सौ. दाते : नाहींतर काय ? आणि त्यांना जेव्हां वाटतं कीं आपलं म्हणणं बरोबर आहे तेव्हां नेमकं ते खोटं असतं ! (बेल वाजते)

श्री. केळकर : ऐका. पुन्हा बेल वाजली. नक्कीच कोणीतरी आहे.

सौ. केळकर : (संतापानें) म्हणून मी काय दरवेळीं दार उघडायला जाऊं ? कांही उपयोग नसतो. कोणी नसतं मेलं. बेल बिघडली आहे झालं.

सौ. दाते : नका जाऊं हो. कोणी नसतं.

श्री. दाते : असं कसं म्हणतेस ?

श्री. केळकर : तेंच ना ! अहो जेव्हां बेल वाजते तेव्हां कोणीतरी निश्चितच दरवाज्याशीं असतंच.

सौ. दाते : पण...

सौ. केळकर : तारा तूं ह्यांच्या नादी लागूं नकोस. स्वतःचं म्हणणं ह्यांना नेहमीं खरंच वाटतं. आपण कधीं चुकतो हें ह्यांना चुकूनहि कळत नाहीं. अगदी हेकेखोर आहेत.

सौ. दाते : म्हणजे डिट्टो दात्यांसारखे !

श्री. केळकर : काहो, तुम्हांला काय वाटतं ? कोणीतरी असावं ना?

श्री. दाते : नक्कीच. त्याशिवाय बेल कशी वाजेल ?

सौ. केळकर : (श्री. केळकरांना) मग एवढी जर खात्री आहे तर तुम्ही स्वतःच आतां दार उघडा.

श्री. केळकर : हरकत नाहीं. उघडतो. बघ नक्कीच कोणीतरी असणार. (श्री.केळकर दरवाजा उघडायला जातात. दार उघडल्यावर ते सौ. केळकरांकडे स्मित करून बघतात व दाते कुटुंबावर नजर टाकतात.)

बघितलंत. अग्निशामक दलाचे कप्तान आहेत. (दोघेहि आंत येतात. सौ. केळकर घुश्यांत असतात.)



श्री. दाते : तुम्ही मध्येंच कुठें आलांत? कुठें आग वगैरे लागली काय?

श्री. केळकर : छे, छे, अहो हे आमचे मित्र आहेत. येतात मधून मधून गप्पा मारायला. पण कप्तान-साहेब आज मात्र तुम्ही वेळेवर आलांत. आज थोडी आग धुमसत आहे.

अग्निप्रमुख : कुठें ?

श्री. केळकर : (सौ. केळकरांकडे बोट दाखवून) ही पहा धुमसत चालली आहे.

अग्निप्रमुख : ह्यांना काय झालं बुवा रागवायला ?

श्री. केळकर : अहो ही खोटी ठरली ?

अग्निप्रमुख : अं ? एवढं झालं तरी काय ?

सौ. केळकर : होणार काय ? ह्यांचं म्हणणं असं कीं जेव्हां जेव्हां बेल वाजते तेव्हां तेव्हां दरवाज्याशीं कोणीतरी असतंच असतं. आणि मी म्हणत होतें दरवेळी कोणी असतंच असं नाहीं.

सौ. दाते : अगदीं बरोबर.

सौ. केळकर : आणि माझं म्हणणंच खरं आहे. मघांशी तिनदां बेल वाजली आणि तिन्ही वेळां मी दार उघडलं पण कोणीहि नव्हतं.

श्री. केळकर : मग माझं म्हणणं खोटं कशावरून ? आतां बेल वाजली तेव्हां मी दार उघडलं आणि हे होते दरवाज्याशीं.

श्री. दाते : कायहो, मघांशी तिनदां बेल कोणी वाजवली ?

अग्निप्रमुख : आतां मला काय ठाऊक ?

सौ. दाते : पहिल्यांदा बेल वाजली तेव्हां तुम्ही नव्हता ?

अग्निप्रमुख : नाहीं !

सौ. केळकर : ह्याचाच अर्थ पहिल्यांदा बेल वाजली तेव्हां दरवाज्याशीं कोणी नव्हतं.

श्री. केळकर : पण कदाचित् दुसरं कोणी असेल.

सौ. केळकर : मग मी दार उघडलं तेव्हां कोणी कसं नव्हतं ?

श्री. केळकर : काय हो ? दरवाज्याशीं तुम्ही बराच वेळ वाट पहात उभें होतां ?

अग्निप्रमुख : नऊशें सेकंद निश्चित.

सौ. केळकर : मग दुसऱ्या कोणी बेल वाजवितांना तुम्ही पाह्यलं नाहीं का ?

अग्निप्रमुख : निश्चितपणें नाहीं.

सौ. दाते : बेल वाजवतांना तरी तुम्ही ऐकली ?

अग्निप्रमुख : हो. पण मी बेल नक्कीच वाजवली नाहीं आणि दरवाज्याशीं कोणी उभें असल्याचेंहि मी पाह्यलें नाहीं.

सौ. केळकर : बघितलंत्. म्हणजे बेल वाजते तेव्हां दरवाज्याशीं कोणी असलंच पाहिजे असं नाहीं.

सौ. दाते : तुमचा विजय असो !

अग्निप्रमुख : वन् मिनिट. तुमचा वाद आतां माझ्या लक्षांत आला मी मिटवतों तो. जेव्हां बेल वाजते तेव्हां कधीं कधीं दरवाज्याशीं कोणीतरी असतं आणि कधीं कधीं कोणीहि नसतं.






श्री. दाते — हें वाकी पटणारं आहे हं.

सौ. दाते — मलाहि

श्री. केळकर : तुम्ही मघांपासून उभें कां ? वसा कीं.

अग्निप्रमुख — छे, छे, अहो बसा काय ? अहो आधींच उशीर झालाय्. पळालं पाहिजे.

श्री. केळकर — डोक्यावरचं शिरस्त्राण तर काढा.

अग्निप्रमुख — (काढीत) ते काढतो पण बसत नाहीं ! आणि आज मी कामानिमित्त आलोय्. I really came on duty.

सौ. केळकर — काय भानगड आणलीत बाई ?

अग्निप्रमुख : भानगड कांहीं नाहीं पण आज ह्या घराला आग लागली नाहीं ना ?

सौ. केळकर : अहो लागली असती तर तुम्हाला कळविलं नसतं का ?

अग्निप्रमुख — अहो पण एखादें वेळीं माणूस कळवायला विसरतो म्हणून आपलं विचारलं. कारण आज पुण्यांतील सगळ्या आगी विझविण्याची कामगिरी माझ्यावर सोपविण्यांत आली आहे. प्रथम तुमच्याकडे आलों, म्हटलं तपास करावा.

सौ. केळकर : आतां आलाच आहांत तर बघतें हं. काय बाई नेम आगीचा ?

श्री. केळकर : बघत्ये कसली ? खुळी कुठली.

सौ. केळकर : तुम्ही गप्प बसा हों.

श्री. केळकर : राह्यलं !

अग्निप्रमुख — (दाते कुटुंबाला) तुमच्याकडे आग वगैरे ?

श्री. दाते — दुर्दैवानें नाहीं !

अग्निप्रमुख — हल्लीं हा आग विझविण्याचा धंदा बसत चाललाय् हेच खरं.

श्री. केळकर : अहो हल्लीं कोणाचाहि धंदा तेजींत नाहीं. फक्त मंत्र्यांचा उद्घाटनाचा धंदा तेजींत आहे.

अग्निप्रमुख — अहो पानशेतनंतर दोन वर्षांत पूर पण नाहीं.

सौ. केळकर — पण शेतकीचा धंदा जोरांत दिसतोय्. कारण बाजारांत हल्लीं गहू भरपूर आहे.

श्री. केळकर : तो सगळा अमेरिकेहून आयात केलेला आहे.

अग्निप्रमुख — तशा ह्या आगी नाहीं का हो आयात करतां येत ? म्हणजे आम्हाला कामं भरपूर मिळतील.

श्री. केळकर : अहो देशांतील आग विझवा आधीं.

अग्निप्रमुख — देशांत आग ? कुठें आहे ? कुठें आहे ? मला तर दिसत नाहीं.

श्री. केळकर : कशी दिसणार ? कारण सबंध देशभर आग पसरली आहे म्हणून तर ती दिसत नाहीं आणि म्हणूनच ती विझवितां येत नाहीं.

अग्निप्रमुख — शुद्ध वेडेपणा आहे हा ! आग लागून दिसत नाहीं म्हणजे काय ? इन्श्युरन्स मिळविण्यासाठीं ही युक्ति आहे.

सौ. केळकर — आतां आग कुठेंच लागलेली नाहीं तेव्हां बसा आणि आम्हाला आगीच्या गोष्टी सांगा पाहूं.

श्री. दाते — तुमच्या गोष्टी अगदीं जिवंत असतात. सत्यानें नुसत्या धगधगलेल्या असतात.

अग्निप्रमुख — त्या अनुभवावर विसंबलेल्या असतात म्हणूनच सत्य असतात.

सौ. दाते — Correct. सत्य हें पुस्तकांत नाहीं तर आयुष्यांत दडलेलं असतं !

सौ. केळकर : हं, करा सुरुवात.

श्री. केळकर : थोडा वाव देता का ?

सौ. केळकर : तुम्ही गप्प बसा हो !

श्री. केळकर : राह्यलं !

सौ. दाते — हं, करा सुरुवात....

(सगळे अग्निप्रमुखाकडे टवकारून बघतात)

अग्निप्रमुख — Ready?

श्री. दाते — Yes, ready.

अग्निप्रमुख — (बराच वेळ खोकतो) तुम्ही सगळे माझ्याकडे असं टक लावून पाहूं नका, अशानें मी नर्व्हस् होतों ! आणि मी थोडा लाजरा आहे हे तुम्हाला माहितच आहे.

श्री. केळकर — वाव देता ना ?

सौ. केळकर — मग देतें हो. वाव कांहीं पळून जात नाहीं आणि

**उदंड जाहलें पाणी**

नळाला पाणी नाहीं म्हणतेस, घे पाणी !

तुमचं डोकंहि पळून जात नाहीं, पण हे कप्तान पळून जातील. आधीं गोष्ट ऐकूं द्या आम्हाला.

अग्निप्रमुख एकदां काय झालं...(खोकतो, पुन्हां खोकतो. मग धीर गंभीर आवाजांत–) एक कुत्रा असा समोरून येत होता आणि दुसऱ्या बाजूनें असा एक बैल येत होता. ही इसापनीतींतील एक प्रयोगात्मक गोष्ट आहे हं.

सौ. दाते चालेल, चालेल सांगा.

अग्निप्रमुख : कुत्र्यानें बैलाला विचारलें, "काय बैलोबा भूक लागली का ?" बैल उत्तरला, "हो!" कुत्रा म्हणाला, "अरे मग शिंगं खा कीं. मला भूक लागली होती तेव्हां मी हेंच केलं. आतां बघ फक्त कान उरल्येत." तेव्हां बैल उत्तरला, "खरंच रे खरंच. मी बैल आहे, मला शिंगं आहेत हें मी विसरलोंच होतों बघ. मी समजत होतो कीं मी माणूसच आहे. बरी आठवण करून दिलीस." संपली गोष्ट.

सौ. दाते पण तात्पर्य काय ?

अग्निप्रमुख तें ऐकणाऱ्यानें शोधून काढायचं असतं.

श्री. केळकर अगदी बरोबर.

सौ. केळकर दुसरी एखादी सांगा.

अग्निप्रमुख It's enough now. सारख्या गोष्टी काय ? थोडं विधायक कार्य करा.

सौ. दाते कोणतं?

अग्निप्रमुख आग लावा कुठेंतरी म्हणजे आपण सगळे ती विझवूं.




श्री. केळकर : पण तुम्ही सगळे आग विझवायला जाण्यापूर्वी मला तेवढा बाम देऊन जा.

(लगबगीनें काश्या प्रवेशतो)

काश्या : धनीसाहेब.

सौ. केळकर : काय रे?

काश्या मी धनीसाहेबांना हांक मारली.

श्री. केळकर : तुला आंत यायला कोणी सांगितलं?

काश्या : मला एक गोष्ट सांगायची आहे.

श्री. केळकर माझ्या प्रश्नाचं हें उत्तर नव्हे.

काश्या कोण म्हणतो? आधीं गोष्ट तर ऐका मग उत्तर देतों.

श्री. दाते इथें तुझी गोष्ट ऐकायला आम्ही जमलेलों नाहींत. आम्हाला कामं आहेत.

काश्या गप्पा मारण्याची.....

सौ. केळकर : काश्या.....!

अग्निप्रमुख : अरे, गोष्टी वगैरे सांगण्यापेक्षां एखादी आग वगैरे विझविण्याचं विधायक कार्य कर ना !

काश्या ते दररोज करतों.

अग्निप्रमुख दररोज ?

काश्या हो. दररोज बंब मीच विझवतों !

अग्निप्रमुख छान्. छान्. म्हणजे आगीचं महत्त्व तुला चांगलं पटलंय्.

काश्या म्हणून तर मी आगीवर रचलेली एक कविता पाठ केली आहे.

अग्निप्रमुख कविता? आणि आगीवर? म्हणून दाखव पाहूं.

काश्या मी नाहीं म्हणणार.

सौ. केळकर : काश्या म्हटली पाहिजे.

काश्या तुम्हाला कामं आहेत ना?

श्री. दाते तीं गेलीं खड्डांत आम्हांला कविता ऐकायची आहे !

श्री. दाते ती गेली खड्ड्यांत. आम्हांला कविता ऐकायची आहे !

काश्या मग म्हणतों तर. कप्तानसाहेब तुम्हाला मुजरा पहिला. (मुजरा करतो) कवितेचं नांव आहे–आगीला लागली आग ! !

सगळे अं ? ? ?

काश्या कृपा करून मध्यें कोणी बोलूं नये.

एकदां लागली एका दगडाला आग –
राजवाडा पेटला
अरण्य पेटलें
माणसें पेटलीं
बायका पेटल्या
डोळे पेटले
रक्त पेटलें
वाळू पेटली
पक्षी पेटले
मासे पेटले

शशी पेटला
निखारे पेटले
आग पेटली
हाय! आगीला लागली आग!!

अग्निप्रमुख (टाळ्या वाजवीत) वन्स् मोअर! अरें एवढं सगळं एकदम पेटलं असतांना आम्हाला कोणी कसं कळविलं नाहीं?

काश्या कारण त्यावेळीं तुम्ही झोपला होतांत, फक्त कवि जागा होता!

सौ. दाते कवितेंतील कल्पना मात्र चांगली आहे हं.

श्री. दाते शिवाय प्रत्येक ओळींत किती ऊब आहे!

श्री. केळकर: काश्या, पुन्हां असली कविता म्हणूं नकोस आणि मला बाम आणून दे बघू.

काश्या आणतों आणि विडी पण फुंकून येतों.
(काश्या जातो).

अग्निप्रमुख बरं आहे मंडळी. मी पण निघतों आतां.

सौ. केळकर या पुन्हां कवीतरी. आगींतून सवड काढून.

श्री. दाते बसा हो. एवढ्या लवकर घरीं जाऊन काय करणार?

अग्निप्रमुख अहो घरीं जाऊन बुटाला पॉलिश करीत बसतों. बरं आहे.

[चौघेहि उठून हात उंचावून निरोप देतात. अग्निप्रमुख जातो पण सगळ्यांचे हात तसेंच उंचावलेले राहतात. अंधार होतो. मग अंधुक प्रकाश पसरतो. घड्याळांत जोरजोरानें ठोके पडतात. ह्यापुढील संवाद रागीट स्वरांत. प्रत्येक संवादांत पारा चढत जातो. चौघेहि समोरासमोर येऊन गुद्दागुद्दीवर आलेले असतात, एकमेकांवर खेंकसत असतात, मुठी आवळलेल्या असतात आणि एकमेकांचा गळा पकडण्याच्या अवस्थेंत ]

श्री. दाते पॉलिश!

सौ. केळकर कोण ओरडलं पॉलिश म्हणून?

सौ. दाते कोणाला अवदसा आठवली पॉलिश करण्याची?

श्री. केळकर: म्हणे पॉलिश! चूप!!

श्री. दाते तूं चूप! स्वतःच्या काळ्या चष्म्याला तूं काळ्या बूट-पॉलिशनें पॉलिश करतोस आणि वर म्हणतोस पॉलिश!

श्री. केळकर मी वाटेल तें करीन. चष्म्यालाच काय, माझ्या मिशीलाहि काळं पॉलिश करीन.

सौ. दाते कां म्हणून?

> **अजून ओळखलें नाहीं?**
>
> **नाहीं ओळखतां आलें? ठीक आहे. कसें ओळखायचें तें सांगतों.**
>
> **तुम्ही गाढव असाल तर प्रश्नच नाहीं. नसाल तर आपण गाढव आहोंत आणि आपलें शेंपूट तुटलें आहे अशी कल्पना करा. आतां पहा जमतें का.**
>
> **(अजून न जमल्यास पान ३७ पहा)**

श्री. केळकर माझ्याजवळ पैसा आहे म्हणून.

सौ. केळकर: ज्याच्याजवळ पैसा आहे तो वाटेल तें करूं शकेल. समजलं सटवे?

श्री. दाते म्हणून काय बुट-पॉलिश चष्म्याला लावायचं आणि वर मिशीला लावण्याची धमकी? बेशरम!

श्री. केळकर तूं बेशरम. मिशीलाच काय पण शर्टलाहि लावीन मी पॉलिश!

श्री. दाते: मग लाव. माझेंहि शर्ट पाठवून देतों.

श्री. केळकर लावीनच.

सौ. दाते: तुमच्या पातळालाही लावा.

सौ. केळकर लावीन... लावीन... लावीन... लावीन...

सौ. दाते: लावा... लावा... लावा... लावा...

श्री. दाते कुत्रीच तुम्ही!

सौ. दाते: भूंऽऽ... भूंऽऽ... भूंऽऽ... भूंऽऽ...

श्री. केळकर आणि तुम्ही मांजरं.

सौ. दाते हडुक चघळा.

सौ. केळकर लोणी पळवा.

श्री. केळकर आणि वर उंदीर खा!

श्री. दाते पॉलिश्, पॉलिश्, पॉलिश्...

सौ. दाते (इंजिनसारखें हात करीत) झुक्... झुक्... झुक्... झुक्... झुक्...

सौ. केळकर (वेडावीत) झुक्... झुक्... झुक्... झुक... झुक्...

श्री. दाते तें!

सौ. केळकर तसं!

श्री. केळकर नाहीं!

श्री. दाते तें!

सौ. केळकर असं!

श्री. केळकर आहे!

सौ. दाते झुक्... झुक्... झुक्... झुक्...
(सगळे एकमेकांच्या पाठीशी उभें राहतात.)

सगळे तें तसं नाहीं... तें असं आहे...
ते तसं नाही... तें असं आहे...
(बराच वेळ)
झुक्... झुक्... झुक्... झुक्...
झुक्... झुक्... झुक्... झुक्...
(बराच वेळ)

[चौघांची आतां एक गाडी तयार होते. श्री. केळकर, नंतर सौ. केळकर, नंतर सौ. दाते आणि शेवटीं श्री. दाते. श्री. केळकर हातानें इंजिन चालवितात. श्री. दाते हातानें बावटा दाखवितात. झुक्... झुक् करीत गोल फिरतात आणि शेवटीं दरवाज्याकडे जात असतांना...

पडदा.]

**[मध्यवर्ती कल्पना: श्री. युजेन आयोनेस्को यांच्या एका नवनाटचावरून]** ●●●








अनुक्रमणिका

*लग्नाआधींची पहिली भेट ! चोरून ठरविलेली आणि चोरून घेतलेली ! पण धडधड नाहीं, हुरहूर नाहीं, लटका रुसवा नाहीं, दिलखुलास हंसणं नाहीं — स्पर्शांत 'जादू' नाहीं कीं नेत्रांत 'इंद्रधनुष्यें' नाहींत.*
*पण असं कां ?*
*ह्या प्रश्नाचं उत्तर कधींच शब्दांत पकडतां येत नाहीं. — इथेंहि तें अवाकच राहिलेलं आहे.*



—सुभाष भेण्डे



**पिठोरी** चांदणं. दंवांत भिजलेलं माघी पौर्णिमेचं नितळ चांदणं. सरळसोट, वाढलेले लांबसडक माड टपोऱ्या चंद्राला कवळूं पहाताहेत. रुपेरी चंद्रप्रकाश ओंजळी भरभरून पिऊन धरित्री ओल्या थंडींत पाय पोटाशीं घेऊन पहुडली आहे. मी एकटाच बसलों आहे. शरयूची वाट पहात. तिचं माझं लग्न ठरलंय्. एंगेजमेंट झाली आहे. असं असूनहि 'मैत्रिणीकडे जातें' अशी बतावणी करून ती मला भेटायला येणार आहे. गेल्या भेटींत तसं ठरलं आहे आणि एखाद्या आज्ञाधारक पतिव्रतेसारखी ती ठरलेल्या वेळीं येणार आहे. प्रियकराला भेटायला येणाऱ्या अभिसारिकेसारखी. खऱ्या अर्थानं अभिसारिका नसूनहि. .

पतिव्रता ? माझा मीच दचकतों. प्रेयसी नि 'वाग्दत्त वधु' — प्रियकर आणि आज उद्यां होणारा पति—तिनं साखरपुड्याच्या दिवशीं माझ्या तर्जनींत घातलेली आंगठी मी चांचपतों. त्यांतला निळसर खडा चमकतो आहे. टपोरा आणि तेजस्वी. अगदीं शरयूच्या डोळ्यासारखा.

मी घड्याळाकडे पाहतों. ती यायला अजून थोडा अवधि आहे. आणि ती न चुकतां ठरलेल्या वेळीं येईल हें मला माहीत आहे. ती येईल ती कर्तव्यबुद्धिनं —दिलेली वेळ चुकवतां कामा नये असं मनाला हजारदां बजावीत. त्यांत ठरलेल्या









अनुक्रमणिका

वेळेआधीं खेंचून आणणारी अधीर वृत्ति नाहीं कीं मुद्दाम उशीरां येण्यांतला मिस्किलपणा नाहीं. जीवघेणी हुरहूर नाहीं कीं लटक्या रुसव्याला आवाहन नाहीं....

दूरच्या देवळांतला घंटानाद कानीं पडतो आणि मी दचकतों. भानावर येतों. देवळापुढल्या दीपमालांवर लावलेल्या मिणमिणत्या दिव्यांचे ठिपके बसल्या जागेवरून मला दिसताहेत. ओल्या विश्रब्ध वातावरणाला छेद देणारा गंभीर नाद आसमंतांत गुंजतो आहे.

असेच आम्ही बसलों होतों. मी आणि माधवी. दूर कुठं देऊळ आहे याची जाणीवहि नव्हती आम्हाला. कुणीतरी घणदिशीं घंटा वाजवली आणि एकमेकांकडे नुसतेच पहात बसलेलों आम्ही भानावर आलों. यंत्रवत् दोघंहि उठलों आणि देवळांत गेलों. आंतल्या प्राकारांत कितीतरी वेळ बसून राहिलों. देवळांतलं तें मंगल वातावरण—फुलांच्या निर्माल्याचा नि पाण्यांत भिजलेल्या वेलपानांचा तो मधुर सुगंध—उदवत्त्यांच्या सुवासाच्या लाटांवर तरंगणारी, मन तरल करणारी गंमतीदार धुंदी——

आम्ही बाहेर आलों तेव्हां दाराशीं काढून ठेवलेल्या माधवीच्या नव्याकोऱ्या चपला कुणी पळवल्या होत्या. आणि मग कांटेकुटे तुडवीत माधवी माझ्यावरोबर निघाली. रानांतल्या पानांच्या खरखरीत जिभा तिच्या पायांना चाटूं लागल्या तेव्हां ती रोषानं म्हणाली—"असाच मला कांट्याकुट्यांतून नेणार का तूं? असंच माझ्या डोळ्यांतून पाणी काढणार का तूं?" आणि मग तिनं 'नको नको' असं विनवलं तरी मी माझ्या चपला हातांत घेतल्या व तिच्यावरोबर अनवाणी पायानं निघालों. तें पाहून किती रडकुंडीस आली माधवी! 'कुठून मी तसं बोललें—' असं शंभरदां म्हणाली ती!——

थंडीनं अंगावर शिरशिरी येते. अंगांतला कोट मी अधिकच दावून धरतों. पट्टयापट्ट्याचा स्कार्फ नीट गळ्याभोंवतीं गुंडाळतों. हा कोट आणि हा स्कार्फ माधवीनं घातला होता तेव्हां किती गंमतीदार दिसली होती ती—! त्या दिवशीं चादणं कसं धुसर होतं. पानाच्या फटींतून झिरपणारे चांदण्याचे कवडसे मोजीत आम्ही बसलों होतों. थंडीची एक लाट अंगावरून चाटत गेली तशी माधवीनं थरारल्यासारखं केलं व पोपटी पातळाचा पदर कानाच्या पाळ्याभोंवतीं लपेटून घेतला. मीं अंगांतला कोट काढला व म्हटलं—"हा कोट घाल ना थोडा वेळ—"

"छे-नको—"

"थंडी कोण पडलीय्—"

"नाहीं वाजत मला थंडी—तुम्हा पुरुषांना थंडीवाऱ्याचं कौतुक भारी—"

"नाहीं वाजत तर नाहीं—पण हा कोट तरी घालशील—मला तुला कोट घातलेली पहायची आहे—"

"इश्श—त्यांत काय पहायचंय्?"

"पण पहायचंय् म्हणतोय् तर—"

"उंहूं—नकोच तें—"

"ठीक आहे! आज तेवढा हक्क गाजवितां येत नाहीं म्हणून! उद्यां तेवढा अधिकार मिळाला——"

मला मध्येंच थांबवून माधवीनं कोट अंगावर चढवला. एवढंच नव्हे तर माझ्या गळ्यांतला स्कार्फ ओढून घेतला आणि हळूच विचारलं—"हक्क गाजविण्यांत मोठ्ठा आनंद असेल नाहीं?"

"जसा कांहीं तुला तो मिळणारच नाहीं कधीं—"

माधवी मिस्किलपणें हंसली. म्हणाली "गाजवूं कां हक्क? आतां मला तुमचा कोट घालायला लावलांत—अगदीं हट्टानं—उद्यां माझी साडी नेसायला सांगितली तर नेसाल?" आणि ती खळाळून हंसली. कोटाच्या खिशांत हात घालून उभी राहिली. राहून अंगाला झोके देत ती मोकळेपणानं हंसत होती आणि मी चिडल्यासारखा झालों होतों.

"फिदी फिदी हंसायला काय झालं तुला?"

"साडी नेसल्यावर तूं कसा हॉरीबल् दिसशील तें सारखं डोळ्यांपुढं येतंय्—! तुझ्या त्या तलवारकट मिश्या साडीला छान शोभून दिसतील! आणि तुझी उंची तरी केवढी अगडबंब! इट् विल बी अ साईट्—हो कीं नाही?."—

"आणि तूं तरी कोट घातल्यावर काय मोठी अप्सरा दिसतेस? पन्नाशींतली, चार पोरांची आई शोभतेस—!"

"चिडलास ना? वाटलंच मला! चिडका बिब्बा! राग अगदीं नाकाच्या शेंड्यावर बसलाय्! उचल लवकर—"

"काय तें!"

"तुझा खालीं पडलेला चेहरा—तो बघ जमिनीवर पडलाय् धूळ खात—"

आणि मला राग आल्यावर मी जें काय करायचं तेंच केलं. तिच्या दोन्ही वेण्या हातांत घेऊन तिला गदगदा हलवलं. हिसके देऊन तिच्या डोळ्यांतून पाणी काढलं तेव्हांच शांत झालों....

वातावरण शांत आहे. त्यांवर थंडीचीं आणखी पुटं चढलीं आहेत. चांदण्यांत माखून निघालेल्या नीरव निस्तब्धतेला गंधाचे धुमारे फुटले आहेत. आजुबाजूचीं झाडं, त्यांमधून ओढ्यासारखा वहाणारा रस्ता, एखाद्या चेटकीनं निर्माण केलेल्या मायावी जगांतला वाटतो आहे. कुणाची तरी वाट पहावी, ओढाळपणानं कुणासाठीं तरी तिष्ठत बसावं अशी ही हवा. कुणाच्या तरी रेशमी स्पर्शासाठीं आसुसविणारी. नुसता हात हातांत घेऊन बसावं, दोन्ही हातांच्या झांकणांत मृदु तळव्याचं मौक्तिक जपावं, थरारलेल्या स्पर्शानं मोहरून गेलेल्या मखमली बोटांत बोटं गुंतवावींत——



**गोपींची वस्त्रें बाळकृष्णानें हिरावली**
**तीच पुढें द्रौपदीला राज्यसभेंत पुरवली!**

•

**एकानं केली बोलाची कढी!**
**दुसऱ्यानं केला बोलाचा भात!!**
**तिसऱ्यानं वायफळांची करून चटणी!!!**
**पहिल्या दोघांवर केली मात!**

••

**चढायला अवघड — प्रतापगड**
**चिरायला अवघड — कलिंगड**
**घालायला अवघड — सांगड!**

•

**—यशवंत देव**

माधवीचा हात प्रथम हातांत घेतला त्या दिवशीं सुंसाट वारा सुटला होता. आणि रस्त्यावर पावसाचे आडवे तिडवे फराटे उठत होते. क्षणांत पानं ओलिचिंब झालीं आणि वडांच्या दाढयांतून पाणी गळूं लागलं. माधवी आणि मी एका पडक्या घराच्या पडवीवर आसऱ्यासाठीं थांवलों होतों. तिचा ओलावलेला लालसर हात हातांत घेण्याची अनिवार इच्छा झाली–पण तिचा स्पर्श तोपर्यंत अनोळखी असल्यानं हात पुढं करण्यास मन धजेना. थोडा वेळ विचार करून हळूंच म्हणालों–"तुझा हात पाहूं ग जरा–"

"कां? त्यांतलं ज्ञान आहे वाटतं तुला?

"तर! चिली आणि वेनहॅम तोंडपाठ आहेत माझे–"असं म्हणून मी तिचा उजवा हात हातांत घेतला आणि डाव्या हातांत तिचा तळवा धरून उजव्या हाताची वोटं त्यांवरून फिरवूं लागलों. त्यांवरल्या मृदु रेषांवरून तर्जनी फिरवित उगाचच कसलेसे हिशेव पुटपुटूं लागलों. आपल्या 'इवल्याशा रुमालाचा वोळा तोंडांत कोंवून माधवी हंसूं लागली.

"कां? हंसायला काय झालं? मला हस्तसामुद्रिक येत नाहीं असं वाटतं कीं काय तुला?"

"येत असेल–पण तूं त्यांतला इलेमेंटरी लेसन् विसरलास–"

"कोणता?"

"स्त्रियांचा उजवा हात पहायचा नसतो–डावा हात पहायचा असतो–"

तिच्या चेहऱ्यावरील मिस्किल भाव सरळ-सरळ न्याहाळतां येईना इतका मी खजील झालों. त्यावेळीं चटकन् मी तिचा हात सोडून दिला पण माझा पडलेला चेहरा पाहून तिनं आपण होऊन माझे दोन्ही हात हातांत घेतले. त्या दिवशीं पाऊस थांवल्या-वर आम्ही एकमेकांच्या हातांत हात गुंत-वून शहरापर्यंतचा रस्ता काटला. त्यानंतर असल्या निवांत वातावरणांत माधवीचा हात कितीकदां हातांत घेतला असेल–तिच्या स्पर्शाला मग हळूहळू धार चढली....

तेंच निवांत, गहिरें वातावरण. आजहि मी वाट पहातों आहे. शरयूची यायची वेळ झाली आहे. ती आल्याशिवाय रहा-यची नाहीं हें माहीत आहे. वाट पाहण्यां-तली हुरहूर नाहीं, येईल कीं नाहीं या विचारांत मन भोवंडत नाहीं. मन दिलं आहे. निश्चितहि आहे. पहिल्या प्रेमांतला आवेग निवाला आहे. गात्रागात्रांतून वहरून येणारा उन्माद कोमेजला आहे. ती उसळी शमली. ती थरारी विरून गेली. उरलं आहे तें कर्तव्याला सामोरं जाणं. भविष्य-काळांत सुखाचे चार कण हातीं लागावेत म्हणून परिस्थितीला शरण जाणं. ती होती वेहोशी. आतां मोजून मापून, धोरणीपणानं उचललेलं पाऊल.

शरयू येते. केसांचा सैलसर अंवाडा व त्यावर माळलेला रातराणीचा गजरा. अत्तराच्या सुगंधाचा फवारा चोहोंबाजूंनी सांडतो. तिच्या चालण्यांत लय आहे, वसण्यांत ऐट आहे. ती विचारते–"वाट पहायला लागली वराच वेळ?"

"हो ना–" मी थंडपणें म्हणतों. रुसवा नाहीं, रागाचं लटकं प्रदर्शन नाहीं, कांहीं नाहीं.

"मी वाहेर निघालें तेव्हां भाऊकाका आले. खोदून खोदून विचारूं लागले 'कुठं चाललीयस' म्हणून. मैत्रिणीवरोवर सिने-माला चालल्येंय् हें पटवून देतांना नाकीं नव आले माझ्या–"

"असं होय?"

पुन्हां नीरव शांतता. काय वोलायचं तें कळत नाहीं. वस्स, एवढंच? याचसाठीं एवढी वाट पाहिली? याच चार शव्दांसाठीं तिष्ठत वसलों? आणि शरयू तरी काय? धांवत आली नाहीं. ठरलेल्या वेळेपूर्वी पोंचण्याची तिला घाई झाली नाहीं. एखाद्या अपरिहार्य गोष्टीस मान खालीं झुकवून शरण जावं, तशी ती आली. असल्या भेटींत न शोभणारा हा थंड औपचारिकपणा–! कीं ही अशीच थंड आहे? अशीच स्थिर आहे? पहिल्यांदा स्पर्श केला तेव्हां थरारली नाहीं. तो स्पर्शहि तिनं अटळ मानला. ती सारं कांहीं गृहितच धरून चालली होती.

मी पुढं सरकतों. कोट काढून तिच्या खांद्यावर टाकतों. तिला पाय पुढें सोडायला सांगून त्यांवर मी डोकं टेकवतों. दंवामुळं ओलसर झालेल्या हिरवळीवर पहुडून मी विचारतों–"शरयू–एक सांगितलं तर रागा-वणार नाहींस ना?"

"काय तें?" ती माझ्या केंसावरून हात फिरवीत विचारते.

"आतां तुला सांगायला हरकत नाहीं. किंवहुना तुला सांगितलंच पाहिजे. एका मुलीवर माझं प्रेम होतं. आम्ही एकमेकांना भेटायचों, एकमेकांवर रुसायचों, रागवायचों-! पण कांहीं तरी घडलं आणि आम्ही एक-मेकांना दुरावलों. परत कधीं न भेटण्यासाठीं. जें वर्ष दोन वर्षं उरीं जपलं त्याचं साफल्य झालं नाहीं–"

"पण आजच कां सांगताहांत मला हें?" शरयू विचारते.

(पान ४८ वर पहा)

*नागपंचमीचा सण महाराष्ट्रांत घरोघरीं साजरा केला जातो. जाग्रणं सुरू होतात. 'चल ग सये वारूळाला–नागोबाला पुजायाला...' चे मधुर स्वर कानांवर येतात. झिम्मा, फुगड्यांचा खेळ सुरू होतो.....*

*श्रीमति डॉ. सरोजिनी बाबर ह्यांनीं करून दिलेला हा नागपंचमीच्या सणाचा ग्रामीण भाषेंतील सुंदर परिचय ––*

—डॉ. सरोजिनी बाबर



**खुळखुळत्या** घुंगुरांची बैलगाडी त्या दिवशीं दम टाकलेल्या पावसाचं घुंगट मागं सारीत आमच्या दारांत आली तशी मी हारखून टुम्म झालें. आम्हाला आजोळी न्यायला मामा आले असं उडया मारीत मी आईला सांगायला घरांत धावणार तर गाडींतून उडी घेत खालीं उतरून मामांनी मला हाळी दिली. म्हणतांना मामा आल्याची बातमी आईला खच्चून ओरडून देत मी माघारी वळलें. धावत जाऊन मामांच्या कमरेला मिठी मारली. त्यामुळं माझ्या अगाखांद्यांवरून हात फिरवीत मामांनीं मला कौतुकानं विचारलं, "निघायचं कवा पोरी ? पंचीम दोन रोजावर आली. आईनं तुला दिस बुडायच्या आंत घेऊन ये म्हटलंया. कसं मग ?" त्यासरशीं मी चटकन् बोललें, "चल आत्ता मी येतें. झुबला पोलकं पिशवींत भरलं की बास. जाऊंया का लगीच न्हाईतर ?" पण मग माझं बोलणं आवरलं. कारण हातांत शिळया भाकरीचा तुकडा आणि पाण्याचा तांब्या घेऊन आमची आई तेवढयांत बाहेर आली.

त्यामुळं मी मागें सरलें. आईनं मामाला त्या शिळया भाकरीच्या तुकडयानं ओवाळलं न् तो मर्वी मोडून त्याच्या दोन्ही अंगांनीं फेकून दिला. त्याच्या पायावर पाणी ओतलं. आणि मग त्याला पोटाशीं धरून ती म्हणाली, "बेस हाईत का बाबा सारी ? आन् किती वाट बगावी रं राजा ? खळाळल्यालं न् मुसांडी मारत धावत्यालं नदीनालं कवाच शांत झालं तरी तुजा पत्त्या न्हाई ! म्हटलं झालं तरी काय बाई !" म्हणून तिला वाकून नमस्कार घालीत मामा बोलला, "चुकी माजीच् हाय. मी गेलतों गांवाला. तर तिथें आडकून पडलों, नदीला महापूर आला तवा – हेयऽऽ लई पानी नदीला–तारेची नाव बंद पडली तर !"

"असूंदे. चहा करतें. शेवाया रांधतें. जेव मग. आनीक नंतर बसू बोलत." आईनं बिगीनं घरांत जात मामाला बसायला चवाचं जेन टाकलं. मग ती आंत गेली. म्हणतांना मी मामाला विचारलं, "मला एकलीला न्हेनार का आईला पण गा मामा ?" तसा मामा हंसला. म्हणाला कसा, "दोगींला पण. आई सगळ्यांला घेऊन ये म्हटलीया. तुला झक्कास चिरडी आनलीया."

"खरं म्हणतूंस ?" मामाच्या पाठुंगुळीवर लोळत मी माझा आनंद व्यक्त केला आणि गुणगुणत सुटलें –

"पान पुडा कीं शंकर चुडा की शंकरचूडा
मामा माझा कीं लेकुरवाळा कीं लेकुरवाळा
त्यानं आणली कीं तेलंग साडी कीं तेलंग साडी
नेसुन गेलें मी बुरजावरी कीं बुरजावरी...
त्यातलं रेशिम काय काय परी कीं काय काय परी

आणि एकलीच बसलें कीं भिंतीसंगं झिम्मा खेळत ! तें बघून मामा तर हंसलाच पण त्याला चहा घेऊन येतेली आमची आई दांतांत पदर धरून म्हणाली, "बग, कवा जाईन झालंया हिला. मामाकंड चिरडी घेनार म्हनतीया सोदी !" तशी मी तिला सांगून टाकलं, "मामानं साडी कधीच आनलीया पन. नागारपंचीम खेळायला मी जानार ते काय ठावं न्हाई व्हय ह्यास्नी ?"









अनुक्रमणिका

"त्या चिरडीपाय तर उशीर झाला आक्का. मी गेलतों भिलवडीला. रामू शिप्याच्या लेकानं इंदूरासनं चिरडी आनलीया. अशी हाय म्हनतीस का वगत न्हावावं." माझ्या बोलण्यावर मामा असं म्हटला म्हणतांना मी राजीखुशीनं चुटक्या वाजवून नाचत बाहेर आलें. ढेलजेंत बसलें. तिथल्या आरशांत विघतलं. मी कशी दिसतेंय् त्याची परीक्षा घेतली. आणि कपाळावरच्या टिकलीजवळ कुंकू फरपटलंवृ तें हातानं नीट केलं. आणिक आज्जीजवळ घुंगराच्या मासूळच्या मागायचं ठरवून मी पंचीम खेळतांना म्हणायच्या झिम्म्याच्या गाण्याची वडवड केली —

माझ्या सोनीचं चांगुलपन ग
जसं केवडयाचं पान
वाळच्या वुगडयांनीं भरले कान ग
वाई कापाला सोडवान
काप घेतीलं विकयीत ग नाकीं सूरव्याची नथ
नथीबाईला आरयिली ग
काळच्या पोतीला डोरयिली
डोरल्याखालीं सरी लोळं, पडला सरीला ग पीळ
वाजूवंद मी लेलीयेली, वाजुवंदाचं आऊचिट
सई लेतीया चीरी गोट
वाई अंगठ्यांनीं भरलीं बोटं
पायीं पैंजण वाजयितीं ग
वोटीं जोडवीं झिनकारिती

आणिक माझ्यासमोर एक पण पोरगी चटक्यांचा झिम्मा घालायला नव्हती तरी —

सई सई गोविंदा येतो
मजवरि गुलाल फेकीतो
तुज्या वाई गुल्लालाचा भार
आमच्या वेण्या झाल्या लाल
आमच्या वेण्या मोकळ्या
सोनीयाच्या साकळ्या
घड रे घड रे सोनारा
माणिक मोती विजवरा
विजवराला खिडक्या
आमी वाई लेकी लाडक्या
लाड सांगूं वापाला
मोती मागूं कापाला

हें गाणं म्हणत मी भिंतीसमोर खेळलें ! तें वघूनं आमच्या शेजारची चिगी पळत येत मला म्हणती कशी, "लई जोरांत ग पंचीम ?"

"तूं ये. खेळूंया. मी जानार हाय वागनीला आजूळाकडं. म्हातारू आईनं मुराळी धाडलाय. त्यो वग मामा आलाय. वलणीवर झोका घेतेला शेला त्येचाच की ! त्यो वग !" चिगीला मी झाली गोष्ट सांगितली. म्हणून आपल्या तोंडावर आलेल्या झिपऱ्या मागं सारीत ती वोलली, "कवा जानार तूं मग ?"

"आज !"

"आणीक ? खेळायचं कवा मग आपुन ?"

"आत्तां. ये. धर फुगडी."

"फुगडी नको. सकाळपासनं फुगड्या खेळून पाय दुकून आल्यात."

"झिम्मा धर मग."

"पोरींला वोलावूं का ?"

"वोलीव. दे हितनंच हाळी."

"आणिक गीत कोन वोलल ?"

"मी मी !... तुला काय वाटलं ?"

"लई जोरांत हाईस ?"

"मग ?"

"वरं मी वोलीवतें पोरींला. तूं गीत घोकून ठेव तंवर." चिंगी आश्चर्यानं माझ्याकडे वघत निघून गेली आणि मी येत होतं तें गीत म्हटलं सुद्धां —

रुण् झुण्त्या पांखरा
जा माझ्या माहेरां
कमानी दरवाजा
त्यावरी बस जा
घरच्या आईला तूं
सांगावा सांग जा

पण मग मधेंच जीभ चावलें. मामा मुराळी होऊन आलावता तरी त्याला धाडून द्यायला कसं सांगायचं ? चुकलंच. म्हणतांना —

श्रावण हंकारी, हंकारीं
करा ग पंचीम साजरी
श्रावण हंकारी, हंकारी
या वाई पंचमीची सांडो
आणिल मामा जरिकाडीं
श्रावण हंकारीं, हंकारी

हें गाणं मी गुणगुणलें तर तें पण मला जरासं फिक्कंच वाटलं. कारण मामांनी चिरडी आणली वती कधींच ! मग ह्या गीताचं कारणच काय निघावं ? म्हणून मी आमची आई आमच्या गांवाला गेलेल्या आज्जीजवळ न् वावांच्या जवळ कसं गीत गाईल तें आठवलं—

या वाई पंचीम सणाला
वंधु आल्याती निऱ्याला
तपकीर वडत्या आत्तीयींनू
जाऊं काय जी म्हायारीं
नागारपंचीम खेळायाला
जातें मी म्हायारीं
मला काय ग पुसती
पुस जा तुपल्या सासऱ्याला
चिलीम वडत्या मामांजीनू
जाऊं काय जी म्हायारीं
नागारपंचीम खेळायाला
जातें मी म्हायारीं

आणि मग ह्या सगळ्या यादींत आईनं मला पण विचारावं असं





वाटलं. पण मी एवढीशी तर मला कोण विचारणार ही कल्पना आली म्हणतांना मी तो नाद सोडून दिला.

तेवढ्यांत चिंगी पोरींना घेऊन आली न् आम्ही चार फुगड्या खेळून झिम्मा खेळत गीत गायलों —

यंगीं यमुनेचा घाट
शिरीं पाणियाचा माठ
राधे तुझा रंगपाणी
किष्णा तरी झाला दंग
पायीं पैंजण तोडं वाळं
विरुद्याच्या घंग्राघोळ
राधे तुझा रंगपाणी
किष्णा तरी झाला दंग
गळ्यां पुतळ्याची माळ
ठुशीवरनं देती ढाळ
राधे तुझा रंगपाणी
किष्णा तरी झाला दंग
नाकीं सरज्याची नथ
चमकी वरी मारी झ्याक
राधे तुझा रंगपाणी
किष्णा तरी झाला दंग

त्यावेळीं मला आमच्या मामांच्या आळींतील पोरी आठवल्या. गेल्या सालीं त्यांच्यासंगं खेळलेली वर्षाची पंचीम आठवली. आणिक त्यांच्यासंगं लाह्यांनीं भरलेल्या रेशमी झोळ्या घेऊन मी गौरीच्या सणाप्रमाणं न्हवणाला गेलें वतें तें पण ध्यानांत आलं. त्या कारणानं त्या पोरी झिम्मा खेळून दमल्या वत्या तर त्यांना मी पंचमीचं गीत सांगितलं —

चल ग सये वारुळाला
नागोबाला पूजायाला
हळदकुंकूं वहायाला
ताज्या लाह्या वेचायाला
जमूनिया साऱ्या जणी
जाऊं बाई न्हवणा
जिथं पाय ठेवूं बाई
तिथं उठ्‌लं दवणा
चल ग सये वारुळाला
नागोबाला पूजायाला
या ग या गडयिनी
या ग या मैतरणी
तेल्या तांबूळचाचा बाई
वाण्या बामणाच्या बाई
जमूनिया साऱ्या जणी
जाऊं बाई न्हवणा

आणि मग पंढरीच्या दामूजी — सोनारानं घडविलेला वांगडीचा जोड आपण घ्यावा म्हटलं तरी घरच्या जावानणंदांचा जाच नको म्हणून या गीतांत सांगितलेली भावना बोलायची तशीच राहिली. कारण पोरींनीं लगोलग फेर धरायची गोष्ट काढली न् चिंगीनं आपल्याजवळचं एक गीत सांगितलं —



# मराठी रंगभूमीचा उगम

## प्रतिष्ठापना

**मराठी** रंगभूमीची प्रतिष्ठापना कृष्णेच्या तीरावर सांगली येथें १८४३ सालीं झाली. त्यावेळचे सांगली संस्थानचे अधिपति श्रीमंत चिंतामणराव आप्पासाहेब पटवर्धन हे मोठे रसिक, दानशूर, सकल कलांचे आणि विद्येचे भोक्ते होते. एकदां पौराणिक नाटकें करणाऱ्या उत्तर कानडा प्रांतामधील एका भागवत मंडळीचा एक नाट्यप्रयोग सरकार स्वारीपुढें करून दाखविण्यांत आल्यावर अशा तऱ्हेचीं पौराणिक आख्यानें कानडी भाषेंतून होत आहेत तर मराठी भाषेंमधून कां असूं नयेत असा विचार मनांत येऊन श्रीमंतांनीं आपले खासगीमधील एक आश्रित विष्णुपंत भावे ह्यांच्यावर ही कामगिरी सोंपविली. भावे यांचें वय त्या वेळेस अवघें अठरा-एकोणीस वर्षांचें होतें, परंतु त्यांची जिद्द मोठी होती ! त्यांना कविता करण्याचा नाद होता — संगीताचा व्यासंग होता. मातीचीं चित्रें, रंग काम आणि चित्रकला यांची त्यांना विशेष आवड होती. वेगवेगळ्या पोथ्यापुराणांचा अभ्यास केल्यानंतर त्यांनीं रामायणांतील कथा निश्चित केली आणि 'सीता-स्वयंवर' हें गानयुक्त आख्यान नाट्यरूपानें रचून पदेंहि स्वतः तयार केलीं, त्यांना मधुर चाली बसविल्या. पात्रयोजना तयार करून कसोशीनें तालमी दिल्या. पात्रांचे पोषाख, किरिट कुंडलें इ. आपल्या कल्पनेप्रमाणें मनाजोगतें तयार केले.

सांगलीच्या सरकारवाड्यांत श्रीमंत सरकार आणि दरबारी मंडळी यांचे समोर आपल्या पहिल्या 'सीता-स्वयंवर' या संगीत नाटकाचा प्रयोग भावे यांनीं १८४३ सालीं करून दाखविला. हा प्रयोग सर्वांच्या पसंतीस उतरला. श्रीमंत खूप झाले आणि भाव्यांना त्यांनीं भर सभेंत शाबासकी दिली ! मंडळीचे सूत्रधार भावे आणि सर्व नटवर्य ह्यांना सरकारी आश्रय सुरू झाला. रामायणावर आधारलेलीं आणखी दहा नाटकें भाव्यांनीं पुढील एका वर्षांतच श्रीमंत सरकारांच्या पुढें प्रयोगरूपानें रुजूं केलीं. इतक्यांत श्रीमंत सरकारांच्या अकालीं अशा निधनानें त्यांचा राजाश्रय तुटला आणि झालेलें कर्ज फेडण्यासाठीं म्हणून त्यांना आपली नाटक मंडळी घेऊन फिरतीवर









अनुक्रमणिका

निघण्याची वेळ येऊन ठेपली ! परंतु या फिरतीमुळें नाटयकला 'लोकाभिमुख' झाली ! सर्वसामान्य रसिक जनांच्या समोर नाटय-प्रयोग सादर करण्याची पद्धति भाव्यांनीं सुरूं केली — रूढ केली. प्रथम कोल्हापूर नंतर पुणें मुंबई अशा मोठया शहरीं त्यांनीं नाटय-कलेचा झेंडा उभा केला !

पुढें पुढें इतर नाटकामधील पद्यरचना करतांना भावे आपल्या नांवाचा उल्लेख 'विष्णुदास' असा करूं लागले. विष्णुदास भावे ह्यांचें अनुकरण करून पौराणिक नाटकें करणाऱ्या ज्या अनेक नाटक कंपन्या विशेष प्रसिद्धीस आल्या त्यांत सांगलीकर, आळतेकर, कोल्हापूरकर, पुणेकर, इचलकरंजीकर, उंब्रजकर, अंमळनेरकर या होत. या नाटक मंडळांचे इतर नाटककारांनीं लिहिलेले नाटय-प्रयोग विष्णुदास भावे ह्यांनीं लिहिलेल्या पौराणिक नाटकांच्या सांच्यावरहुकूम होत असत इतकेंच नव्हे तर विष्णुदास भावे यांचीं पदें या पौराणिक नाटकांत पुष्कळदां म्हटलीं जात. या सर्व पौराणिक नाटकें करणाऱ्या नाटयप्रयोगांना म्हणूनच 'विष्णुदासी नाटकें' असें म्हटलें जातें. पौराणिक नाटकें सामान्य जनतेपुढें प्रयोग-रूपानें आणण्याचें कार्य विष्णुदास भावे ह्यांनीं प्रथम केलें. यासाठीं त्यांना 'मराठी रंगभूमीचे जनक' असें गौरवपूर्वक संबोधतात.

आपल्या वैभवशाली मराठी रंगभूमीचा पाया विष्णुदास भावे ह्यांनीं सांगलीस १८४३ सालीं आपल्या 'सीता स्वयंवर' या पहिल्या मराठी नाटकानें घातला ! सांगलीला श्रीमंत पटवर्धन सरकारांच्या ज्या सरकारवाडयांत भाव्यांनी आपल्या प्रथम नाटकाचा प्रयोग करून दाखविला त्या वाडयाचा दर्शनी चौक वरील छायाचित्रांत दिसत असून मराठी रंगभूमीच्या गंगोत्रीचें पवित्र दर्शन इथें आपणांस घडत आहे !

('मराठी रंगभूमि' या चित्रपटांतील चित्रसंग्रहामधून—निर्माते दिग्दर्शक श्री. के. टी. देशमुख यांच्या सहकार्यानें)

---

आली पंसीची पंचीम
लोकाच्या लेकी वा म्हायारीं
आमची बाळाई सासरीं
आरं तूं सुवाना रं लेका
जावं बाळाई आणायाला
संगं घ्यावं भूक लाडू
संगं न्यावं तान लाडू
घ्यावा शेलकाच वारू
आरं तूं सुवाना रं बाळा.....

परंतु आम्ही तिला मधेंच थांबवली. कारण त्या गीतांतील झालेला माहेरवाशिणीचा छळ आम्हाला ठाऊक होता. म्हणून नसतं दुःख उभा करून ह्या पंचीम सणाच्या आनंदाचा हिरमोड नकोच म्हटलं. पण घरला फेर सुटावा कसा तसाच ? म्हणून मी गीत बोललें —

चंद्र कशानं कोम्याला वाई
दिवस कुठं जी मावळला
दादा आल्यांती निम्पाला
नागार पंचीम खेळायला
रजा द्यावी वो जायाला
रजा न्हाई मी दियाची
बदमी खरकी लावायची
बदमी खरकी नेल्यात्या तोडूनी
रजा द्यावी वो साजणी
चल चल मैना तूं झरझरी
शाळू दिवस कानेली
कशी दादा मी चालूंजी
साकळच्या हिन्नाच्या द्योतल्या जी
दे जा टाकूनी हिन्नाच्या
घालीन घडवीन् चांदीच्या

तेवढयांत मामा न् आई बाहेर आले. आईनं मला विचारलं "पंचीम हितंच खेळतीस काय ग?" आणि मामा पण बोलला "काय पोरी हो, घरला गांवाकडं सवड मिळायची न्हाई म्हन हितंच खेळतीस काय?" तशी पोरी खेळत होत्या त्या पांगल्या. धूम पळून गेल्या. आणि मी आईला विचारलं, "जायचं कवा मग मामासंगं? वर्साची पंचीम जवळ आली न्हवं?"

त्यावर आई कांहींच बोलली नाहीं. त्या कारणानं मला काय वाटलं की —

नाच ग घुमा
कशी मी नाचूं
अंगण वाकडं, भंवतनं लांकडं
कशी मी नाचूं
या गांवचा त्या गांवचा
सुतार न्हाई आला
माज्या बाळाला राघू न्हाई दिला
कशी मी नाचूं...

असलं कीं कांहीं सूप खेळतांना म्हणतात त्या गीतांतलं आठवून आई गप्प झाली असेल. म्हणून मीच तिला पुन्हां विचारलं, "गप कां? वाट बगतीयास कुणाची तूं?" तरीपण ती बोलली नाहींच. मग वरीक मी तिच्यावर रागावलें, "या परास न्हाई जायाचं म्हन कीं मग!" तशी मामा हंसून म्हणाला, "ते कां? न्हाई काय म्हनून ग?"

"मग ही कां बोलत न्हाई?"

"तुज्यासंगं काय बोलायचं तिनं? तुजी आज्जा आज्जी घरांत न्हाईती तर परवानगी कोन देनार जायाला असं म्हणतीया."

"तर मग मला घेऊन चल!" मामानं आईचं कारण पुढं केल्या-वर मला घाई झाली. म्हणून मी बोललें तर आईनं डोळे मोठे करीत मला दटविली. म्हणतांना मला गप्प बसणं भाग पडलं. पण जीव कुठं रहातोय्? मागच्या दाराला जाऊन मी एकलींच पंचीम खेळूं लागलें —

ह्या वाई पांखराचं
अंजनी डोळं कीं गुंजनी डोळा
हे वाई पांखरूं
कोणाशीं बोलं, राजाशीं बोलं





अनुक्रमणिका

राजाच्या पलंगाशीं
कोण बाई उभं
राजाच्या पलंगाशीं
लक्षुमण उभं
त्यांनीं आंदील्या
केळीच्या फण्या
त्या काय लाविल्या
धुरपायच्या म्हालां
घाल ग धुरपे
अंजनी वारी, गुंजनी वारा
चतुर भरतारा सांग- बाई जरा
पंचीम सणाला जातें मी म्हायारां

पण' मग गीताला व्होवा तसा रंगच भरेना. एकलीनं कसं गीत चांगलं दिसावं नाहीं का? म्हणून मी कोपऱ्यांत बसलें आणिक वागणीला गेल्या बरोबर पोरींना सांगायच्या गीताची जशी काय घोक्कंपट्टीच केली—

दोन तीन बैलांच्या लागल्या ढुशी
बाई लागल्या ढुशी
त्यांत माजी करंगळी, गमावली कशी
बाई गमावली कशी
धाकल्या दिराला, गवसली कशी
बाई गवसली कशी
धाकल्या दिराचं, काय मत झालं
बाई काय मत झालं
सासू सुग्रीणिला, कळू गेलं
बाई कळू गेलं
सासुवाई सुग्रीणिचं, काय मत झालं
बाई काय मत झालं
दोन तीन चाबूक, उडवीले वाई
उडवीले
ते वाई चावूक, दूरच्या दूर
वाई दूरच्या दूर
माझं म्हायार, पंढरपूर बाई
पंढरपूर
माझं आजूळ, रत्नांगिरी
वाई रत्नांगीरी
रत्नांगिरीच्या, टांक्यावरी वाई
टांक्यावरी
शेला झुलतो नाक्यावरी वाई
नाक्यावरी
नाग डुलतो, चाफ्यावरी
बाई चाफ्यावरी

आणि मग मला वरं वाटलं. म्हणतांना पंचमीच्या दिवशीं दळण-कांडण करायचं नाहीं, चुलीवर तवा ठेवायचा नाहीं, पाटा वरवंटा घेऊन कांहीं वाटायचं नाहीं, सारवण—सुरवण करायचं नाहीं असल्या गोष्टी आठवित बसलें. मनानं मग हळदीचा नागोवा भितीवर काढून त्याला चुन्याच्या न् कोळशाच्या टिकल्या मारल्या. चिखलाच्या नागोवाला लाह्या न् दूध घातलं. आणि दारांत 'नागो-वाला दूध' असं ओरडत येणाऱ्या वैदूच्या पायांतील घुंगरांच्या व तोंडांतील पुंगीचा आवाज ऐकत आपल्याच नादांत दंग झालें.

## अरेरे, मग अगदींच गाढव आहांत!

अजून जमलें नाहीं ? कमाल आहे. गाढवाला जें सुचलें तें तुम्हांला सुचूं नये ना ! अरेरे !
ठीक आहे. सांगतों.
त्यानें एक बादली घेतली. ती पाण्यानें भरली. मग त्यानें आपलें डोकें त्या पाण्यांत बुडविलें. जीव जाईपर्यंत त्यानें डोकें बाहेर काढलें नाहीं.
समजलं ? आतां तुम्ही पण तसंच करा. नालायक कुठले ! गाढवाला जें सुचलें तें तुम्हांला सुचूं नये !

—वि. रा. भाटकर.

तेवढ्यांत आमची आई तिथं आली. आमच्या आण्णांना विचार-लंय् म्हणाली. आणि आम्ही उद्यां सकाळी पंचीम खेळायला मामासंगं जाऊंया म्हणून बोलली. त्या सरशी चटकन् उडी मारून मी आईच्या कमरेला मिठी मारली न् तिनं न मागतां तिला मुका देऊन टाकला ! आमच्या मामानं तें वगीतलं तर म्हणतो कसा, 'येऽऽ-चल ये हिकडं. चिलमीवर विस्तू आण जा. काम करावं पोराच्या जातीनं' तशी मी पळत जाऊन त्याचं काम ऐकलं. आतां एवढा हुरुप मनांत भरला की, पुढचांत येईल तें काम मी भराभर करीत सुटलें. सांच्याला एवढ्या एवढ्या भाकरी दिवून टाकल्या तर! पंचमीचा जोग खेळतांना न् झोका घेतांना भराभर अंग मागंपुढं झोके घेत पळावं तशी मी हालले तें ! सारीजणं माझ्याकडे बघतच राहिलें. पण मी कशाला कुणाला दाद द्यायला बसलेंय् ! मी आपली मामासंगं उद्यांला जाऊन खेळणार असलेल्या पंचमीच्याच नादांत. दुसरी तिसरी पंचाईत करूंच कशाला? ● ● ●

## एक 'नम्र' विनंति !






अनुक्रमणिका




**लहानपणच्या** कांहीं गोष्टी कधीं कधीं अवचित आठवून जातात!

–काल अशीच आठवण झाली.

प्रसंग असा घडला....

आम्ही आज राहतो तें घर तसं फार मोठें नाहीं. आणि पावसाळा आला की या घराचा हा मर्यादितपणा फारच जाणवतो. पावसाळ्यापूर्वी अंगणांत ..वळचणीखालीं ज्या अनेक वस्तु ठेवतां येतात त्या साऱ्यांना पावसाळा सुरू होतांच घरांत मानाची जागा द्यावी लागते. त्यामुळें एरवी जेमतेम पुरणारें घर अधिकच संकोच पावतं ! – काल असंच झालं! खाटा, कोळशाचे लाकडी खोके आणि अशाच कांहीं सटरफटर वस्तु पाण्यानं ओल्या होऊं नयेत म्हणून घरांत आणाव्या लागल्या व त्यामुळें मधल्या खोलींत लावलेला पाळणा काढून टाकणं भाग पडलं.

वाहेर खेळण्यांत गुंतलेलीं दोन्हीं मुलं त्याच वेळीं घरीं आलीं.

आमच्या त्या कृतीकडे दोघंहि क्षणभर विस्फारलेल्या डोळ्यांनीं वघत राहिलीं. अखेर धाडस करून राजू म्हणाला,

"वावा, पाळणा काढून टाकतां?"

"हूं!"

"राहूं द्या नं! आम्हाला झुकझुक गाडी खेळायला पाह्यजे.."

"हो वावा ! झ्युक-झ्युक गाली खेलाला पायजे–"

संजूनें त्याला मी तुझ्या पाठीशीं खंबीरपणें उभा आहे हें सुचवलं.

माझी दृष्टि मी नकळतच त्यांच्याकडे वळवली. त्यांच्या टपोऱ्या डोळ्यांतले अपेक्षेचे भाव मला कळले व पाळण्याला घातलेले हात लगेच मागे घेत म्हणालों,

"राहूं देऊं?"

पण त्यावर त्यांच्याकडून उत्तर येण्यापूर्वींच ही म्हणाली,

"कांहीं नाहीं राहूं द्यायचा! असला लावलेला म्हणजे मेले ढुंकून पाहात नाहींत तिकडे. अन् कधींमधीं खेळायला लागलेच तर असे धुम्मडतात की न कळे परमेश्वर! परवां या राजूनं असाच एकदम जोरानं झोका दिला न् संजू पडला. नशीव फारसं लागलं नाहीं––

तिच्या आरोपाला उडवून लावण्यासाठीं राजू कुरकुरला,

"आम्ही मुद्दाम पाडलं का ग? तोच म्हणाला झोका दे—"

आतां वोलण्याची पाळी संजूची होती.

"झ्योका दे म्हतलं, पन पाल म्हतलं का?"

त्या दोघांच्या अस्तित्वाची काम करण्यांत अडगळ वाटूं लागल्यानं त्यांच्या आईनं दोघांनाहि खडसावलं,

"वरं वरं ! दोघंय् सारखेच आहात तुम्ही. जा. वाहेर खेळा. नाही तर पाटीपुस्तक काढा न् अभ्यास करीत वसा...."

एरवीं, कदाचित दोघंहि तिथंच घुटमळत राहिले असते. पण 'अभ्यास' हा परवलीचा शव्द ऐकतांच त्यांनीं माघार घेतली.

"आम्ही वाहेर खेळतों ग आई—"

"आमी वाएर खेळतो आई—"

वाहेर जातां जातां त्यांनी सूचना दिली.





अनुक्रमणिका

# झोका




आम्ही पुन्हा आमच्या उद्योगाला लागलों. पाळण्याची पाटी भिंतीला टेकवून दिली आणि दांड एकमेकांत गुंतवून ठेवले.

दुपारीं वामकुक्षीच्या ऐन बहरांत डोळा उघडला.

आपला उत्कट आनंद व्यक्त करण्यासाठी मुलं कशा प्रकारे आरडाओरडा करतात हें मी सांगायला नको ! पाळण्याच्या खोलींतून राजूसंजूचा तसाच आवाज कानीं पडला. या आवाजांत तिची गाढ झोप जर मोडली तर मुलांच्या अंतिम हिताच्या व शरीरस्वास्थ्याच्या दृष्टीनं तें इष्ट होणार नाहीं हें मला माझ्या अंतःप्रेरणेमुळें चटकन् कळलं. मी लगेच उठलों व खोलींत आलों... पावलं न वाजतां पाहिलं...

—आणि पाहातच राहिलों !

एकमेकांत गुंतविलेल्या पाळण्याच्या दांडांना धरून राजू लोंबकळत होता... झोके घेत होता व तें पाहून संजू खदखदा हसत होता! दोघंहि आनंदानं ओरडत होतीं.

मला एकदम लहानपणची आठवण झाली.

मी त्यावेळीं लहान, म्हणजे आठनऊ वर्षांचा होतों. आईवडील खेड्यावर राहून शेतीकडे बघत- तिथल्याच शाळेंत मी शिकत होतों. आमच्या अंगणांत एक उंच झोपाळा बांधलेला असे. सागाचे पंधरा वीस फूट उंचीचे असे फ़ाटे...दोन एकीकडे व दोन दुसरीकडे...उंच टोकांवर एकमेकांना छेदतील असे जमिनींत गाडलेले होते. वर त्याच्यापेक्षां थोडा लहान असा फाटा आडवा बांधलेला होता. शेतींतच पिकणाऱ्या सोनतागाचं माणसांनी विणलेलं भक्कम चऱ्हाट घेऊन त्याचे दांड बनविलेले होते व त्याचीं चार टोकं एका लाकडी पाटीच्या चारहि कोपऱ्यांतील छेदांतून ओवून भक्कमपणानं बांधलेलीं होतीं. पाटी एक हात रुंद व दीडदोन हात लांब एवढी असून जमिनीपासून फार तर दोनेक हात उंचावर लोंबत असेल ! अशा पाटीवर पाय ठेवून दोघाजणांनीं एकामेकाकडे तोंड करून उभं राह्यचं. (कधीं कधीं एकानंहि. पण सोबतींत जी मजा येई, ती एकटेपणीं मात्र तेवढीशी येत नसे ! ) दोन्ही हातांनीं दांडाचा उभा दोर घट्ट धरून ठेवायचा व जरा मागे ताणून झुकायचं आणि मग नुसत्या पावलांवर मागे पुढे भार देत शरीराला आंदोलनं द्यायचीं व हळूहळू झोका वाढवायचा... अधिक... आणखी अधिक...! दोघांपैकीं प्रत्येकालाच आपल्या हेलकाव्यामुळें झोका अधिक उंच जातो असं वाटत असल्यामुळं ते हेलकावे वाढत जायचे आणि झोक्याचा वेगहि वाढायचा...

.....पुरेसा वेग आला की मग आम्ही स्तब्ध उभे राहात असूं आणि मग झोपाळ्याच्या वेगाशीं समरस होऊन जात असूं ! पूर्वेकडून पश्चिमेकडे अन् पश्चिमेकडून पूर्वेकडे...

झोपाळा वेगांत येण्यापूर्वी भोवतालचीं उभीं असलेली माणसं स्पष्ट दिसत असत. परंतु एकदां त्याला वेग आला की त्यांचं अस्तित्वच तेवढं भासत असे. त्यांचं रूप...रंग.. आकृति सारं कांहीं त्या वेगांत विरून जाई. एकदां एकीकडे उंचीचं शेवटचं टोक गाठलं की तिथं झोपाळा किंचित् क्षण स्तब्ध झाल्यासारखा भासे. दूरवरचं क्षितिज... हिरवीगार झाडं...क्षितिजाला ओठंगून उभे असलेले सावळे-निळे ढग आणि बखरून झालेलीं किंवा पिकानं डवरलेलीं वावरं तेवढ्या निमिषार्धात डोळ्यांना सुखवीत. दुसऱ्याच क्षणीं तो विरुद्ध दिशा घेई व तेंच सुख पुन्हा अनुभवतां येई ! झोपाळा जमिनीकडे येत असतां खालच्या आकृति जरा स्पष्ट होत आणि मग त्या आकृतींच्या चेहऱ्यावरचं कुतूहल... कौतुक मनाला स्पर्श करून जाई.

वाटे, सगळं जग हें स्वप्न आहे अन् सत्य आहे तो केवळ हाच एक झोका... खालून वर... वरून खाली...

—आणि झोका हा जन्मभऱ्याचा सवंगडी झाला त्या क्षणापासून !

पुढच्या शिक्षणासाठीं खेडं सोडावं लागलं. शहरांत यावं लागलं. झोपाळा दूर गेला. पण झोका मात्र दूर झाला नाहीं... होऊं शकला नाहीं ! दहाजणांचं घर. तिथं पाळणा नसेल असं कसं होईल ? एवढंच होतं की खेड्यावर ज्या प्रमाणांत त्याचा संबंध यायचा तें प्रमाण कमी झालं ! — आणि वेगहि पण ! वय वाढलं म्हणून वेग मंदावला असं नाहीं. मनांत तर अजूनहि येतं की पुन्हा तो वेग साधावा. तोच कशाला ? मनाचं साह्य घेऊनच झोका घ्यायचा असेल तर येवढ्याच वेगावर कशाला थांबायचं ?...आणि, हंसणार नसाल तर सांगतों. वाटतं, या आकाशमध्यावर हूक अटकवावेत. त्याला पृथ्वीला स्पर्श करूं पाहतील असे लांब दोर बांधावेत आणि मग त्या दोरांना बांधलेल्या पाटीवर उभं राहून उंच झोका घ्यावा. अधिक उंच... आणखी अधिक उंच... क्षणांत् पृथ्वीच्या पूर्व गोलार्धांत... तर क्षणांत पश्चिम गोलार्धात ! — आणि सहज चाळा म्हणून पूर्वेचं अध्यात्म पश्चिमेच्या पदरांत टाकावं अन् पश्चिमेचं विज्ञान पूर्वेच्या—

हंसू नका ! यांत अशक्य... अतर्क्य असं कांहीं नाहीं ! मी सहज करून दाखविलं असतं हें. फक्त एक अडचण तेवढी नको होती ! — माझ्याजवळ पाटी आहे,... आकाशापर्यंत पोहोचूं शकतील एवढे लांब दोरहि आहेत. आणि हूकहि आहेत ! पण ते हूक कुठं अडकवावेत हाच प्रश्न आहे ! कारण आकाशाला हूक अडकविण्यासाठी कोयंडाच नाहीं !... आणि हीच माझी अडचण आहे....

झोके घेण्याची माझी ही अडचण पुष्कळांना जरा विचित्र वाटते. घरीं पाळण्यावर पालखट मांडी घालून मी बसतों न् दांडांना दोन्ही



अनुक्रमणिका

हात घालून जेव्हा भरभर झोके घेऊं लागतो, तेव्हां ती ओरडते–

"हें काय लहान मुलासारखं ? जेव्हां पाहावं तेव्हां झोका... झोका... झोका ! शोभत नाहीं तुम्हाला असं वागणं–"

याचा परिणाम झालाच तर झोक्याचा वेग वाढण्यांत मात्र होतो. निषेधाचा आविर्भाव करून ती उद्गारते,

"तुम्हाला सांगितलं न् तुम्ही ऐकलं––"

"अग पण यांत वाईट काय आहे एवढं ?"

"एखाद्या वेळीं जीव मळकेल अन् ओकारी होईल तेव्हां कळेल..."

मलाहि गंमत करायची लहर येते. थोडा झोका कमी करून मी म्हणतों,

"हें मात्र अगदी खरं हं ! ओकारीचा न् पाळण्याचा संबंध आहे हें मी एकदम कबूल करतों––"

"चला !"

ती उद्गारते. तिच्याकडून वाद बंद झाला त्याची ही खूण. माझ्या झोक्याचा वेग पुन्हा वाढतो.

आपणालाहि माझ्यासारखीच संवय असेल तर मी सांगतो तें तुम्हाला पटल्याखेरीज राहणार नाहीं. झोका घ्यायला सुरुवात केली की तुम्ही थोड्याच वेळांत... अगदी तुम्हाला नकळत... एका वेगळ्याच विश्वांत जातां !– निदान मी तरी जातों. मग भोंवतालची सृष्टि या नव्या जाणीवेंत वितळून जाते. शरीराला झोके मिळतात तसतसं मनहि नाचूं लागतं. झोका वाढत जातो तसतसं मनाचं नृत्यहि वेग घेऊं लागतं. त्याची लय वाढूं लागते. अनेक कल्पना मग मनांत जन्म घेतात. मन अगदी तरल होतं. शरीराचं बंधन झुगारून तें वावरूं लागतं. धावूं लागतं. संथपणीं जीं जाणवली नव्हतीं अशीं अनेक रहस्यं त्याला आढळतात. तें त्यांना विलगतं... कुरवाळतं..! आणि अनिर्वचनीय सुखाचा अनुभव मनुष्याला प्राप्त होतो. मी जेव्हा जेव्हा झोका घेऊं लागतों तेव्हां तेव्हां हाच अनुभव मला मिळालेला आहे. सारं सुख मुक्तींत आहे आणि इंद्रियांच्या बंधनांतून मन मोकळं होणं हाच मुक्तीचा अर्थ आहे हें एरवीं न पटणारं तत्त्वज्ञान अशा वेळीं मला अक्षरशः खरं वाटूं लागतं !– किंबहुना तेंच केवळ खरं आहे याची खात्री पटूं लागलेली असते ! गर्भवतीला पाळणा करण्याची आपल्याकडे जी चाल आहे ती म्हणूनच मला मोठी अर्थपूर्ण वाटते. ती पाळण्यावर बसते. अगदी मंदपणानं का होईना, झोका दिला जातो. आणि त्याच वेळीं तिचा गर्भ झोक्याशीं अगदी पहिल्यानेंच परिचित होतो. जन्मानंतर मूल पाळण्यांत गप्प होतं तें हा परिचयाचा झोका प्राप्त झाल्यामुळेंच !– झोका आणि जीव यांचा असा अविभाज्य संबंध आहे.

–ज्यांना हा संबंध कळत नाहीं ते विचारे झोके घेण्याला नांवं ठेवतात ! त्यांना पाळणा आवडत नाहीं. झोका घ्यायला सुरुवात केली की त्यांना मळमळूं लागतं. इतकंच नाहीं, तर दुसऱ्याला झोके घेतांना पाहूनहि त्यांना मळमळ सुटते...

पण ज्यांना तो संबंध कळतो ते झोका घेतच असतात. स्वतः घेतात व दुसऱ्यांनीहि तो घ्यावा असा आग्रह धरतात !

म्हणूनच राजूला तसं लोंबकळतांना पाहून मला आनंद झाला. मी पुढें सरलों. तसा तो वेगळ्याच कल्पनेनं घाबरला. दांडाचे हात सोडून कसाबसा खाली आला. मी म्हणालों,

"अरे, तसं लोंबकळूं नये. हात दुखतील–"

"मग ?"

"थांब–"

मी जवळची चादर ओढून त्याची घडी केली व दोन्ही दांडांची गुंतवणूक ज्या ठिकाणीं केली होती तिथें ती ठेवून दिली. नंतर राजूला वर उचललं. त्या घडीवर पाय टेकायला सांगितलं. दांड हातांनीं धरायचे कसे ते समजावून दिलं. आणि सांगितल्याप्रमाणें तो नीट उभा राहिल्याचं पाहून म्हणालों,

"आतां अगदी पक्के धरून ठेव हं दांड ! सोडायचे नाहीत–"

"नाही सोडत–"

"आता मी झोका देतों–"

"द्या–"

आणि मी झोका दिला. आनंद व विस्मय यांनी त्या दोघाहि भावांचे चेहरे उजळून निघाले होते. राजूचं झोका घेणं संपलं तसं मी त्याला खाली उतरवलं. आता संजूची पाळी होती. संजूनंतर पुन्हा राजू... नंतर पुन्हा संजू... पुन्हा राजू...

त्यांची आई दारांत केव्हां आली तें कुणालाच कळलं नाहीं ! बहुधा झोक्यामुळें झालेला आनंद त्यांनी नेहमीप्रमाणेंच ओरडून प्रगट केला असावा. माझी दृष्टि तिच्याकडें जातांच ती रोषानं म्हणाली,

"मुलांनाच काय म्हणायचं––"

–– आणि स्टोव्ह पेटवायला निघून गेली.

आम्हा तिघांचं मन तिला समजावून घेतां आलं तर काय बहार येईल !

●●●



## महत्त्वाची सूचना -

**लेखकांसाठीं :** बऱ्याच लेखकांचें "दीपावली" कडे आलेलें व नापसंत ठरलेलें साहित्य आमच्याकडे कांहीं महिने पडून आहे. तें परत हवें असेल तर त्या लिखाणास पुरेसें पोस्टेज लेखकांनीं त्वरित पाठवावें म्हणजे तें त्यांच्या पत्त्यावर रवाना करतां येईल. पोस्टेज पाठविणाऱ्यांसच असें साहित्य परत करण्यांत येईल. अन्यथा तें तावडतोब निकालांत काढलें जाईल व त्यासंबंधीं पुनः कसलाहि पत्र-व्यवहार केला जाणार नाहीं. नापसंत कविता परत पाठविल्या जात नाहींत याचीहि कृपया नोंद घ्यावी.

––संपादक




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# अग्निमाचा डोंगर

**पूर्व कथासूत्र–**

**कान्ताचा आणि वासंतीचा संवाद द्वारकानाथ कुळकर्ण्यानें ऐकला होता. त्या मुलाला संरक्षण हवें आहे हें त्यानें ओळखलें होतें. आणि म्हणून त्यानें संरक्षण देण्याच्या हेतूनें त्या त्रास देणाऱ्या मुलांना हंटरनें बडवून काढायला सुरुवात केली––**

**वासंतीचा उर कृतज्ञतेनें भरून आला. पण त्यांतूनच–––**

**(दाजी नाबराच्या कहाणीचें अखेरचें, रंगतदार, पण मनाला हलवून सोडणारें प्रकरण––पुढील अंकीं)**

[२४]

**दोन** दिवसांनीं द्वारकानाथ आतेबाईच्या चौकशीला आला. भरदुपारलांच. आतेबाईचा नुकताच डोळा लागला होता. कान्ता शाळेंत. दाजी कामानिमित्त बाहेरगांवीं गेला होता. बाहेर झोपाळयावर वासंती कादंबरी वाचीत एकटीच पडली होती.

चाहूल आली आणि तिनं दाराकडे पाहिलं.

"अय्या ! तुम्ही ! अन् ह्या वेळीं ?" ती आश्चर्यानं पुटपुटली. लाजेनं अर्धमेली झाली होती. केसांचा अंबाडा अर्धवट सुटून मागं मानेपर्यंत उतरला होता. जुनं, विटकं पातळ अंगावर. आणि तेंसुध्दां अपुरं. खुशाल अस्ताव्यस्त पडली होती ती झोपाळयावर–उताणी.... आणि.... आणि समोर दारांत हा–द्वारकानाथ कुळकर्णी !

पदर छातीवर ओढत वासंती आंत पळाली. चट् दाराआड झाली.

"चाललों होतों वाटेनं. म्हटलं आतेबाईची खबर घ्यावी." द्वारकानाथानं आपल्या अगांतुक आगमनाचा खुलासा केला.

"या ना, बसा ! आईचा जरा डोळा लागलाय्." दाजींच्या खोलींत शिरत वासंतीनं म्हटलं.

"मग या कशाला ? जातो झालं ! " त्यानं हंसत म्हटलं. सलगीनं, अपेक्षेनं.

"आई फाडून खाईल मला, हें कळलं कीं."

"मग मात्र बसायलाच हवं. तुम्हाला कोणी फाडून खावं हें आपल्याला पसंत नाहीं" तो खुप होता. त्याच्या अपेक्षेप्रमाणं झालं होतं.

दाजींच्या खोलींत काळोख होता. टेबलापाशीं वासंती त्यांतल्या त्यांत ताजं वर्तमानपत्र शोधत होती.

"दाजींच्या खोलींत यायचं म्हणजे भीतीच वाटते बघा !" मागं दारांतून द्वारकानाथ कुजबुजला, "हा काळोख, तीं पुस्तकं, दाजींचा तो चष्मा—"

"ईश्श् !" वासंती उगाच हंसली. तिरप्या मानेनं तिनं मागें त्याच्याकडे पाहिलं. अंधुक, सांडल्या प्रकाशांत द्वारकानाथ तिला वेगळाच दिसला. आणि मग तिला आठवण झाली. चाचरत, चावत ती पुटपुटली, "थँक्स हं ?"

"कां हो ! कशाबद्दल ?" त्याला माहीत, आणि तरीहि त्यानं वेड पांघरलं.

"मेल्या त्या पोरांनीं कान्ताचा छळवाद लावला होता–" वासंतीला पुढं बोलवेना. तिचा स्वर कातर झाला होता. गळा दाटून आला होता.

"नको सांगूं ! समजलों.

"तुम्ही नसता तर––"

"अहो, मी आहेच, असाच राहणार ! वासंती, कधीं कळणार हें तुला ?" द्वारकानाथ एकदम पुढें झाला. काळोखांत अलगद त्यानं तिला जवळ ओढली.

एकच क्षण! वासंती थरारली. वाटलं ओरडावं, प्रतिकार करावा—त्याच्यापासून दूर–दूर पळावं! एकच क्षण! आणि दुसऱ्याच क्षणीं ती त्याच्या बाहुपाशांत पार विसावली. त्या उनउनीत स्पर्शानं निवली, पुरती वितळली. श्वासाला श्वास मिळाला, ओठांना ओठ. आणि मग तिची बाकी जाणीवच गेली, संपली, माती माती झाली.

## –श्रीराम कामत

होऊं नये तें झालं होतं. करूं नये तें वासंतीनं केलं होतं. एकदां–आणि मग जें एकदां झालं तेंच अनेकदां—कितदांतरी! तीहि एक झिंग आहे, बेहोषी आहे. व्यसन आहे. क्षणाचंच सुख! आणि मग सतत, रात्रंदिवस यातना, वेदाना, हुरहूर, आग— कळतं, पटतं, वाटतं! आणि तरीहि तें तेंच नको तें होतं, होत रहातं. माणसाच्या एरव्हीच्या कळण्याला, वाटण्याला, पटण्याला तेव्हां कांहीं अर्थ उरत नाहीं. कारण तेव्हां कांहीं वेगळंच वाटत असतं. वेगळं आणि वस्स तितकंच!

दोष नशिबाचा! कपाळाला हात लावावा हें बरं !

होय! वासंती कपाळालाच हात लावून बसली होती. देवळांतील खळनाथाला नवस बोलत होती.

पुढं आतेबाईला वेंगुर्ल्याच्या हॉस्पिटलांत टाकलं. इथं आठ दहा दिवस होती. मग ऑपरेशनला भिऊन ती हॉस्पिटलांतून पळून आली. घरांपर्यंत जेमतेम पोचली, आणि दारांतच कोसळली.. आणि मग वासंतीला पाहिलं आणि आपल्या वेदना विसरून आतेबाई एकदम ओरडली, "वच्छी, अग काय तुझी ही दशा?"










"माझी नको काळजी करूंस आई! मला नाहीं धाड भरत." वासंतीनं कसावसा जाब दिला. रडव्या तोंडानं हंसण्याचा प्रयत्न केला.

"कुणास ठाऊक! पण वच्छी तुझी मात्र वाट लागली ग. वोड-क्याचे केस कित्ती पातळ झालेत हे. डोक्यामोंवती काळे खंदक पड-लेत. तोंडावर मुरमं आणि अंग थलथलीत सुटलंय्—वाटावं, माझ्या पोरीला डोहाळेच लागलेत." आतेबाई हळहळली.

"आई—" वासंती दचकून केवढ्यानं तरी ओरडली होती. आईच्या तोंडानं अदृष्ट बोललं होतं.

आणि मग हें अदृष्टच तिला भेडसावूं लागलं होतं. रातला गुंगींत आतेबाई मलतंच कांहीवाही वरळत सुटली की पोरीचा थरकांप उडे, काळोखांत पापाला वाचा फुटूं लागे.

अदृष्ट!

दाजी नावर सांगत होता गांवालाहि तें भोवतं आहे. गांव अजगराच्या जवड्यांत पडलं होतं. कंपनीनं त्याला गळयापर्यंत आवळत आणलं होतं.

पण काय जनावरं हीं! नाहीं, जनावरांहून वेअक्कल! कारण जनावरांनासुद्धां ही अक्कल असते. अजगराच्या जवड्यांतून सुटण्या-साठीं धडपडतात, तडफडतात.

गांवांत लोकं मजेंत होतीं, जोरांत होतीं, चैनींत होतीं.

महिनामरांत कंपनीच्या खाणी वर रानांत सर्पांच्या पिलां-सारख्या सर्वत्र झाल्या होत्या. धडाधड उडणाऱ्या सुरुंगाना घावरून सर्प आणि कोल्हीतरसं मात्र गांवात वोकाळलीं होतीं. भीष्म उघडा पडला होता, रान साफ उजाड झालं होतं. दिवसात फक्त ट्रक, डंपरं आणि खाणीवर वावरणारीं लोकं. कानावर पडे, लोकांचा गलबला, हातोड्यांची अन् फावड्यांची ठय्–ठक्, डंपरांची घरघर, ट्रकांची धूसफूस आणि पोंग्यांचा कर्कश आवाज. आणि ढीग पडत होते, वाढत होते. निरुपयोगी दगडधोंड्याचे आणि मातीचे. हे ढीग वाकी फुगत होते, उंचउंच वाढत चालले होते. आभाळाला भिडूं वघत होते.

भीष्मावर तिकडे वाजूला एका कोपऱ्यांत काजूचीं चार झुडपं आणि सावलीचीं दोन झाडं अजून तग धरून होतीं. उघड्या, उजाड डोंगररानांत हीं एकदम उठून आणि ठासून नजरेंत भरत. कंपनीच्या कवज्यांत न आलेली उभ्या डोंगरावर आज तितकीच जमीन होती – फक्त तितकीच! कारण ती दाजी नावराची होती. कंपनीला विरोध करणारा गांवांत तो एकटाच उरला होता.

आणि अखेर ह्या जागेचासुद्धां लिलांव होणार होता. दाजीच्या माऊबंदांनी दावा साधला होता. दाजीनं नाहीं, त्याच्या ह्या भावांनीं अशक्य तें शक्य केलं होतं. पण जमीन कंपनीच्या ताब्यांत जाऊं नये म्हणून दाजीची निकराची धांवपळ चालली होती.

आणि म्हणून गांव त्याला हंसत होतं. नाहींतरी नेहमीच हंसत आलं होतं. पण मागं. उघडं तोंडावर नाहीं. इतके दिवस गांवांत त्याचा तसा वचक होता. त्याच्या हेतूंवद्दल कोणी कधीं संशय घेतला नव्हता. आज तो संशयच लोकं घेऊं लागलीं होती. बोलत होतीं, 'अरे देणीं झालींत दाजीला. हातांत पैसा नाहीं. तो वसंत वापला वोंवलतो आहेच. वायकोचं ऑपरेशन परवडेना म्हणून हॉस्पिट-लांतून घेऊन आला आतेवाईला—हिथं घरीं मरायला. आणि म्हणून तर लिलावांत काढतो आहे जमीन. लिलावांत एकदम मोठी रक्कम हातांत पडणार. काय? कंपनीची रॉयल्टी मिळणार महि-न्याला—तिसरा हिस्सा ह्याचा. म्हणजे. फक्त चाळीस रुपये!...'

इलाज नव्हता. गांवाची दृष्टि वदलली होती, श्रद्धा फिरल्या होत्या, वऱ्यावाईटाच्या कल्पनांची उलथापालथ झाली होती. गांवाचं उद्यां काय होणार हा प्रश्न लोकांना आतां सतावेनासा झाला होता. आपलं भलं म्हणजे गांवचं भलं आणि जें आज चाललं आहे तेंच उद्यां चालणार ही विचारसरणी त्यांच्यांत बळावली होती.

म्हणूनच महामायेच्या देवळाला जेव्हां कंपनीनं सोन्याचा कळस घातलं तेव्हां उभं गांव उत्साहानं पेटलं असल्यास आश्चर्य नव्हतं!

आश्चर्य हें म्हणजे खुद्द कंपनीनंच ह्या गोष्टीचा तसा गाजावाजा केला नाहीं. व त्याहूनहि आश्चर्य म्हणजे ह्या कळसावर अण्णा गुरुजीसुद्धां फारसा खुष नव्हता. तीन लाख रुपये कवूल करून कंपनीनं फक्त वीस हजारांचाच कळस दिला होता. अण्णाचा विश्वासघात केला होता. मॅनेजर गोळेसाहेव म्हणत होता, कंपनीला ह्या वर्षी तसा फायदा झाला नाहीं. गांवात रस्ते वांधण्यात वरीच रक्कम उडाली होती. अर्थात् हा खर्च गांवावरच झाला आहे, वगैरे वगैरे.

लोकं त्या वादांत पडलीं नाहींत. कारण नव्हतं. पण ह्या निमि-त्तानं महामायेच्या देवळांत सप्ताह चालला होता. सात दिवस धमाल उडून राहिली होती. देवीपुढं रोज मलीमोठी आरास वांधत. दिव-साला ती वदलत. पुराणांतील एखाद्या आख्यानावर देखावा उभा करीत. ही गर्दी लोटे. दिंड्या, मेळे, भजनं रात्रभर चाले. लोकांकडे पैसा होता. आणि तो खर्च करायला कांहीं वाटेनासं झालं होतं. अशा उत्सवांत घाटी लोकं नेहमींच पुढं असतात. गांवच्या लोकांतहि मनापासून आणि खूप उत्साहानं सामील झालीं. हीं आणि गांवची लोकं प्रथमच एकत्र आलीं होतीं, वरोवरीनं वावरत होतीं.

घरोघर पट्टी गोळा केली जात होती. ती जमा करायला खुशाली आणि चारदोन पोरं दाजी नावराच्या घरांत शिरलीं तेव्हां दाजी ओटी-वर उभा होता.

दाजीनं खुशालीला विचारलं, "काय आहे रे?"

खुशाली पक्का. तो वोलला, "काय—आतेबाईकडे."

"हूं:! कसलं?"

दांत काढून हंसला, पण जाब न करतां खुशाली आंत जाऊं लागला.

दाजी उसळला, "भांचोद! बोलायला पण तयार नाहीं! आं—"

"तसं नाहीं दाजी. पण नकोच, उगाच चिडाल-बिडाल म्हणून भीति. "खुशाली कारण नसतांना पाघळला, "पट्टी मागायला आलों आहे."

"कसली पट्टी?"

"महामायेचा सप्ताह चालला आहे ना, त्याची."

"पट्टी? सप्ताहाची पट्टी? माझ्या घरीं मागतां भडव्यांनो? हरामखोर! लाज नाहीं वाटत? नीघ आधी, चालता हो—" दाजी

अनुक्रमणिका






-नावर हात उडवीत पोरांच्या अंगावर धांवला. "सप्ताह करतात मांचोद! माजलेत, डोळे फुटलेत ह्यांचे. म्हणून दिसत नाहीं. अरे, काय चाललं आहे? उद्यां काय होणार? कुठं आहांत रे तुम्ही? आं! करा—निदान थोडा विचार करा—"

"पण गांवात सगळ्यांनीं पट्टी भरली दाजी." खुशाली हातांतील लांबलचक यादी उघडीत म्हणाला, "भाऊ कुळकर्ण्यानं दहा रुपयं टाकलेत. आणि तुमच्या बाळासाहेबानं पण"

दाजीनं झेप घालून यादी हिसकली. तिचे फाडून कपटे कपटे करीत तो म्हणाला, "शेण खाल्लं भडव्यांनीं; जा, सांग जाऊन—"

माजघरांत आतेबाईनं हें ऐकून उच्छाद मांडला होता. पोरासारखा गळा काढून ती रडूं लागली. "छी:! काय हें? झाला; ह्यांनी सत्यानाश केला."

"आई–" वच्छी समजूत काढूं लागली.

"वच्छी, होय! हें बऱ्याचं लक्षण नाहीं." तिची आई आर्जवानं म्हणाली, पोर, तूंच निस्तर हें. मी तर मोडून पडलें—अशी मोडून पडलेय् ग..."

●

## [२५]

**कान्ताला** वावापुता करून वासंतीनं आईपाशीं बसविलं होतं. आणि तिन्हीसांजला महामायेच्या देवळांत जाण्यासाठीं ती बाहेर पडली.

भरसमामंडपांतून नाहीं, बाजूच्या दिंडी दरवाजानं ती देवळांत शिरली.

डोळे निवावेत अशीच सुरेख आरास होती. गांवाची महामाय, वाघावर बसली होती हातांत तरवार, खालीं पायाशीं पडला होता राक्षस जीभ काढून रक्त ओकत. शिवाय हरिश्चंद्र-तारामतीचा देखावा. स्मशानांत तारामती सरण रचते आहे, बाजूला रोहिदासाचं प्रेत, मागं कुऱ्हाडे उगारून तिच्यावर घाव घालण्यासाठीं हरिश्चंद्र तयारींत आहे. तें स्मशानांतील वातावरण, किर्र काळोख, मध्येंच कोल्ह्यांचं रडणं, रातकिडचांची कीरकीर— अप्रतिम, हुबेहूब चित्रण होतं. अगदीं सिनेमांतल्यासारखा.

वासंती तर तल्लीनच झाली. तगमग विसरून देवीपुढली ही आरासच बघत राहिली. आजूबाजूला तिचं बिलकुल लक्ष नव्हतं

आणि गर्दींत कोणीतरी तिचा मागून हात धरला. तिला मागं ओढलं, "कां आलीस?"

तो खुशाली होता. बरोबर दहापंधरा तरुण पोरं होतीं. सगळीं खाणीवरचींच, गांवातलीं, घाटीसुद्धां.

"मेल्या, हात सोड—" वासंती तडकली.

> **महत्त्वाची सूचना–**
>
> **ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपया करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.**
>
> **—व्यवस्थापक**

खुशालीनं हात सोडला. पण धक्का देऊन तिला दुसऱ्या पोराच्या अंगावर लोटून दिलं. आणि तो खो: खो: हंसत सुटला.

संतापानं वासंतीच्या अंगाची लाही लाही होत होती. त्वेषानं तिनं विचारलं, "मेल्यांनो, लाज नाहीं वाटत?"

"वाटूं? कुठं? पाटावर का खाटीवर? हा: हा:" एकानं खिदळत प्रश्न केला.

"तुझ्या थोबाडावर—" आणि तिनं हात उगारला.

या पोरानं तो वरच्यावर धरला. म्हटलं, "वा रे वा नखरा! ह्याच्यापायींच तर त्या विजयसाहेबाचं वाटोळं झालं. बसलं, पाय घालवून आणि वरोबरच नोकरी. दाढी वाढवून अण्णागुरुजींच्या शाळेंत मास्तर झाला आहे आतां. तूं मात्र मागें लागलीस त्या द्वारक्याच्या. थू: तुझी! वामणाची रे ही पोर—रांडा बऱ्या, रांडा—"

वासंतीनं रडकुंडीला येऊन म्हटलं, "जाऊं देतां की नाही मला? का ओरडूं—?"

जाव केला खुशालीनं. मान रुबाबांत वर करून हा जरबीनं बोलला, "ओरड, मार बोंब. तुला सोडवायला कोण येतो बघतों मी."

खरं होतं. इतका तमाशा चालला होता तो बघायला एव्हाना देवळांत गर्दी जमली होती. गांवांतील सगळी प्रतिष्ठित मंडळी बघत होती. अण्णागुरुजी, बाळचा सुतार, गुणाजी नाडकर्णी–द्वारकानाथ कुळकर्णीसुद्धां. पण ह्या पोरांना दम द्यायला कोणी पुढं होईना–पोरं ऐकली तर वरं, नाहीं तर फुकट चार चौघांत शोभा. म्हणून स्वत:शींच नाराजीनं कुजबुजत राहिलीं.

आणि मग हातांनं लोकांना बाजूला करीत सावित्री कुठूनशी धांवत आली. आणि ओरडतच, गर्जना करीत, "अरे धरलं वाघटानं तुम्हांला. सोड तिला. जाऊं द्या—"

"सावित्री, तूं मध्यं पडूं नकोस! पोरं उसळलीं.

"हात मुड्या! कोण रे—कोण तो! थोबाडच फोडतें—" सावित्रीनं पुढें घुसून वासंतीला पाठीशीं घातलं. सांगितलं, "पोरी नको रडूंस! आहे मी. बघतें ह्या मुड्यांना."

वाटेनं जाणारा येणारा प्रत्येक इसम ह्या दोघींकडे मुद्दाम वळून अन् वांकून बघत होता.

नाहींतरी एव्हांना गांवभर झालं होतं कीं महामायेच्या देवळांत खाणीवरच्या पोरांनीं दाजी नावराच्या लेकीचा हात धरला. पोरीची आणीकहि विटंबना होणार होती! पण नशीव! ती रांड सावित्री धांवली प्रसंगाला.

मग गांवांत ज्याला त्याला सावित्रीचंच कौतुक झालं. एका ढालगज गांवभवानीनं दाजी नावराच्या पोरीची लाज राखावी ही घटनाच विलक्षण होती. वाटावं कीं, महामायासुद्धां ह्या दाजीची चेष्टा करूं लागलीय्. तर आतां काय म्हणावं?

एक वर्षापूर्वीं हा असा प्रकार गांवांत घडताच ना. एरव्हीं पोरं पक्कीं डांबरट, वाह्यात. पण पोरीबाळींच्या वाटेला कधीं नसत. वचक होता घरांत वडील माणसांचा; बाहेर गांवकीचा. कारण हीं अवलंबून असत. घरांत आणि बाहेरसुद्धां. पण कंपनी आली. पोरांना

रोज़गार मिळाला. आठवड्यागणिक हातांत रोख नेमानं पैसा पडूं लागला. आणि तशीं वारं प्यालेल्या वासरांसारखीं हीं उधळलीं. स्वतंत्र झालीं. मन मानेल तसं वागायला आणि मर्जीला येईल तें करायला. आतां कोणाचं ऐकून घ्यायला पोरं तयार नसत. कारण नाहीं म्हणत. आज तीं कोणावर अवलंबून नव्हतीं. घरांत म्हाताऱ्या आईबापांना पोसत. म्हणून त्यांची आवाजी बंद झाली होती. ह्या पोरांना ठणकावून कांहीं सांगण्याची गांवकीच्या बेंडांना छाती नव्हती. त्यांना धास्ती पडे, कार्टी उलट जवाब करतील तर ? त्यांना खात्री नव्हती. फुकट गांवांत हंसं व्हायचं! नकोच तें !

एक सावित्री मात्र ह्या वांड पोरांना धारेवर धरी. ह्यांची मिजास चालूं देत नसे. ह्यांना फाजील सलगी करूं देत नसे.

आतांसुद्धां वासंतीला तिच्यांबरोबर बघून रस्त्यावर घिरट्या घालणाऱ्या वात्रट पोरांना गप्प बसवेना. मागं आवाज चढूं लागत. गाणीं सुरू होत. शिट्या निघूं लागत. सावित्रीचा एक जळजळीत कटाक्ष त्यांच्या दिशेनें आला कीं मग थोबाडं बंद होत. थोडा वेळ. आणि या दोघी जरा पुढं गेल्या नाहींत तर मागं हास्याचीं कारंजीं फुटत.

सावित्रीचं मग तोंड वाजूं लागे. चांगलं खळखळून. एकेका पोराचा त्याच्या नांवानिशी आणि भानगडीसकट उद्धार होई. तिला एकूण एक पत्ता असे. तिच्या जिभेला तर हाड नव्हतंच. शेलक्या जालीम शब्दांत ती नुसती परवड लावून राही.

पोरांना ही सुद्धां एक गंमतच वाटे. सावित्रीच्या तोंडच्या चार निवडक शिव्या पडल्या कीं मग हीं खूष ! पराक्रमानं फुलत. उमेदीनं खदखदत.

वाटभर हें असंच चाललं होतं.

आणि नाक्यावर, पानाच्या दुकानापुढं असलेलं एक जादा आगाऊ पोरगं सिगरेटचा धूर सोडत पुढं आलं. वासंतीकडेच वांकून-वांकून बघत राहिलं. बाकीच्यांना डोळा घालून केंसाच्या भांगावरून हात फिरवीत म्हणालं, "तशी कांहीं एकदम टाकाऊ नाहीं".

"कोण रे मुड्या?" सावित्रीनं विचारलं.

"ही—ही तुझी नवीन भरती सावित्री." त्यानं थंडपणानं उत्तर दिलं. तसाच बघत राहिला—वासंतीकडे. मख्खपणानं.

"मेल्या, जा मसणांत !" सावित्री कैवारानं म्हणाली, "डोळे फुटले काय रे? काय शुद्ध गेली साफ? म्हणून नाहीं ओळखलंस हिला? ताईबाय ही हलकटा—दाजी नाबराची लेक. त्याच्या गोठ्यांत अगणिक शेणकिडे वळवळत पडलेत—तुझ्यासारखे."

"म्हणूनच संशय सावित्री." तें फाजील कार्टं बोललं, "हा खुळा दाजी निघाला लिलांवांत. घरांत दोन टाईम मारामार आहे म्हणतात जेवणांची. शिवाय तें आत्तेबाईचं मढं पडलंच आहे. ह्या बायकांचा काय नेम ? पोरीला धाडीलसुद्धां तुझ्याकडे धंद्याला. पैसा मिळाल्याशीं कारण ! लाज ह्यांना बाकी नसतेच."

"बघतां काय रे ? धरा, धरा ह्याला ! मारा खेटरं ! माणसांत नाहीं तो. जनावरं नुसतं – पिसाळलेलं" असं ओरडत सावित्री पायांतली वहाण काढून धांवली.

वासंतीनं हाताला धरून तिला मागं ओढली. काकुळतीस येऊन म्हटलं, "निघूंया इथनं, चल ना. नाहींतर इथं नाक्यावरच पडेन. डोकं गरगरतंय् माझं. चक्कर येतीसं वाटतं—"

तिच्या अंगावर टच्च कांटा उठला होता. चेहऱ्यावर किळस, शहारा. आणि ओठ शिवशिवत होते.

जवळच्या म्हणून वर रानांतल्या वाटेनं तीं निघालीं. घाटी-पर्यंतसुद्धां पोचलीं नाहींत तर वासंती वाटेंतच थपकल मारून बसली. दोन्ही हातांनीं कपाळ गच्च धरून ओय् ओय् करीत एकदम ओकत सुटली. तिचं तोंड कडवट, लिंबासारखं पिवळंफाक पडलं होतं. कपाळांत शिरा तुटत होत्या. कानशिलं उडत होतीं. पोटांतून वेग लागले होते. जशी आंत आग उठली होती, जाळ पेटला होता. आंतड्यांना बाहेरची ओढ लागली होती. ओकओकून निरस मोकळं व्हावं, रिक्त रिकामं व्हावं म्हणून टाळ्यांत बोटं घालून वासंती आटापिटी करीत होती. पण मग नुसतेच पेटके येत राहिले. आंबट, कडू – तो वास तिच्या नाकांत भरला होता. तिला गुदमरून टाकीत होता, जीव पिळवटून टाकत होता.

सावित्री मागं उभी होती. ती म्हणाली, "पित्त झालंय् ग ताईबाय तुला."

"नाहीं ग सावित्री. ना– ना– नाहीं." वासंतीच्या तोंडून शब्द फुटेना. उमाळा जड झाला, कढ भरून आला. सावित्रीच्या खांद्यावर मान टाकून ती हमसाहमशी रडत सुटली.

"म्हणजे ?" सावित्री चरकली, "ह्या – ह्या तुझ्या बोलण्याचा अर्थ—"



अनुक्रमणिका

डोळे चोळत वासंती बाजूला झाली. गार, विरजलेल्या स्वरांत पुटपुटली, "सावित्री, दिवस गेलेत मला—"

म्हणजे ? म्हणजे ? तोंड उघडं पडलं सावित्रीचं. अजब झालं तिला ! मोठं आश्चर्य ! वाटेल तें भकायला वासंती अर्धवट नव्हती. चांगली बामणाची, शहरांत वागली-वावरलेली, चार बुकं झालेली पोर आणि सरळ सांगत होती – काय ? तर म्हणे दिवस गेलेत आपल्याला. लाज नाहीं, भीति नाहीं. खेद नाहीं, खन्त नाही.

"छी :! ताईबाय, काय नाहीं ती चेष्टा ! नाहीं शोभत."

"चेष्टा नाहीं सावित्री ! खरं– गळ्याशपथ !" तोच गार आवाज, ठार नजर, निर्विकार चेहरा.

आतां मात्र सावित्री उसळली, "काय हें ? बामण तूं – मोठ्या घरची लेक ! थोडा विचार, सुमार, आवर — हें ऐकलं कीं आत्ते-बाई काहीं आतां जगत नाहीं."

"नाहींतरी, आई जगणार नाहींच." वासंतीनं थंड तिऱ्हाइताच्या आवाजांत म्हटलं.

"होय ! टाक मारून आईला. आणि त्या दाजीला पण ईक घाल. मोकळी झालीस मग. एकदम स्वतंत्र. माझ्यासारखी...धंदा करायला. कां येतीस माझ्याकडे. आं ! बघ गर्दी लोटेल दारावर. बामणाची आहेस ना म्हणून. अप्रूण होईल." सावित्री बडबडत होती. उद्वेगानं, हात नाचवीत. तिच्यासारख्या वाईट चालीच्या बाईचंहि मन खचलं होतं, कोसळलं होतं. ओटीवरची महामायेची तसबीर पडून कांच फुटावी, सगळीकडे बारीक बारीक तुकडे सांडावेत, ते गोळा करताना हात रक्तबंबाळ व्हावा तसा – तसा तिचा जीव रक्तबंबाळ झाला होता. जें होणं अशक्य अशी श्रद्धा होती तेंच घडलं होतं. ही जाणीवच तिला सहन होत नव्हती. जाळत होती, गिळत होती. आणि तिच्या स्वभावाचीं माणसं मग चिडीस येतात.

त्या भरांत नकळत सावित्रीचा आवाज चढला. आणि खुद्द तिला पत्ताहि नव्हता, पण ती वासंतीच्या अंगाला झोंबली. दाजी नावराच्या पोरीच्या तिनं झिज्या उपटल्या. पदर फेडला, पातळ ओढलं. आधीं दोन थोबाडींत मारल्या आणि मग लाथाबुक्क्यांनीं वासंतीला ती तुडवीत राहिली.

तोंड चाललंच होतं, "छीः ! खात्री नाहीं राहिली ! दुनियेंत भलं, अस्सल, पवित्र असं कांहीं उरलंच नाहीं ! निकाल लागला सगळ्याचा ! बामणाच्या पोरीसुद्धां शिंदळकी करूं लागल्या तर आतां कशावर विश्वास टाकावा ? आज् कशाची खात्री द्यावी ? बोल रांडे"...

वासंती मुकाट्यानं मार खात होती. प्रतिकार नाहींच, पण रडत नव्हती, ओरडतसुद्धां नव्हती. जशा सावित्रीच्या लाथा अन् बुक्के तिला जाणवत नव्हते. इतकं तिचं शरीर दगड झालं होतं. वृत्ति सुन्न झाल्या होत्या, संवेदना शून्य झाल्या होत्या.

अशांत सावित्रीची एक लाथ तिला वर्मी लागली असावी. आणि वेदनांनीं तिच्यांत जीव आला. जाणीव चेतली. शुद्ध उसळली. वासंती कळवळून किंचाळली, "आई ग मेलें—"

तशी सावध झाली सावित्री. खळबळून, दुखावून हें असंच व्हायचं ! लेकीला बडवीत सुटली कीं तिची शकूसुद्धां अशीच– अगदीं अशीच किंचाळत राही, तिला वाटलं – क्षणभरच भास झाला. आणि शुद्ध आली – तिची पोर फिरून दिसणार नव्हती-कधीं, कधींच नाहीं !

थबथबलेल्या ढगासारखी ती खालीं कोसळली. डोळ्यांतून पाणी लागलं. वासंतीला घट्ट पोटाशीं धरून तिनं मोठ्यानं गळा काढला, "ताईबाय, म्या चांडाळणीनं मारलं ग तुला. शकूला पण अशी – अश्शीच मारायची. आन् पोर मला सोडून गेली—"

तळपीवर वडाच्या झाडापाशीं बाळचा नावर कोणाशीं तरी हुज्जत घालीत होता. ह्या दोघींना बघितलं आणि तो बैलासारखा हुंकारला. पाठ फिरवून ह्यांच्यावरून हात ओवाळीत ओरडला, "काय लखलखाट, काय झगमगाट ! अरे नावराच्या घराण्याचा लाइट गांवभर झालाय् रे ! त्रिखंडांत आमच्या अब्रूचा डंका गरजतोय् ! झाल्या, एकदम बेचाळीस पिढ्या पावन झाल्या. आधींच्या एकवीस आणि आतां पुढल्या एकवीस ! आमच्या ह्या खुळ्या भावाला जन्मभर मरून जें नाहीं साधलं तें त्याच्या लेकीनं तासाभरांत केलं. आनंद आहे, समाधान आहे. आम्हा भाईबंदाना आतां जीव दिल्याखेरीज उपाय नाहीं. भांचोद, अरे लाजा आहेत ना आम्हाला ? अब्रू आहे, नांवगांव आहे. आणि हें सगळं गेल्यावर जगायचं तरी काय कारण ?....."

त्या थेरड्याच्या वटवटीकडे दुर्लक्ष करून त्या तशाच पुढं सटकल्या.

घरावरच्या पांदीत आल्यावर वासंती उचंबळून म्हणाली, 'सावित्री, भीति वाटते ग, काळजी वाटते मला. आई गेल्यावर–"

"छीः ! नको अवचिन्ह बोलूं. आतेबाई बरी होणार—"

"नाहीं, नाहीं ग सावित्री. आईला कॅन्सर झालाय्. ह्या रोगाचीं माणसं जगत नाहींत. आणि मग माझं कसं होईल? काय होईल माझं सावित्री ?" डोळ्यांना पदर लावून हुंदके देत सावित्री गांवा-कडे धांवली.

अण्णा गुरुजीच्या शाळेंत बत्तीचा लख्ख उजेड आणि माणसांची गर्दी दिसली म्हणून फाटकावरूनच सावित्रीनं कानोसा घेतला.

खाणींतली सगळी मुतावळ आज अवशीची इथं शाळेंत जमली होती. पोरंच नाहीं, मले वाप्येसुद्धां. लाल डगल्यांत घाटी लोक उघड्या तोंडांनीं ध्यान देऊन होतीं. चुळबुळत होते कोंकणीच. कारण ते ह्या गांवचे. पोरांचं चित्त तुमानीच्या इस्त्रीकडे आणि केसांच्या भांगाकडे. झालंच तर स्वतःच्या किंवा दोस्ताच्या हातांतील घड्याळाकडे बघून तीं कासावीस चेहरा करीत. ह्यांचा खरा दिवस आतां रात्रीं सुरू होणार होता. तर युनियनची सभा काही आटपत नव्हती. वाप्ये लोक तर पेंगतच होते, जांभया देत होते. ह्या कमळीच्या पोरांचं चऱ्हाट कधीं एकदां संपतं असं त्यांना झालं होतं.

विजय मात्र नाराज होता. त्याचे खोल डोळे उद्विग्न होते. व्यथित, चिरडलेलं अंतःकरण आणि भरडलेला आवाज. टेबलावर मूठ आपटून हा मारे तावातावानं बोलत होता, "ही युनियन गुंडांची नाहीं.










गुंडांना इथं स्थान नाही. त्यांनी बाहेर व्हावं. आतांच, या क्षणीं. खाणीवर वावरणाऱ्या गरीब, अडाणी, पीडल्या अन् नाडल्या जाणाऱ्या लोकांची स्थिति बघून वरं वाटेना म्हणून या फंदांत पडलों मी. माझी इच्छा आणि आशासुद्धां एकच—कीं एकजूट झाली, संघटना बांधली कीं तुमची ताकद वाढेल. होत असलेल्या ह्या अन्यायाविरुद्ध तुमचे तुम्हीच झगडूं शकाल. सध्यांची ही पिळवणूक थांबेल, तुमची स्थिती सुधारेल... आणि युनियन स्थापन झाली. पण आठ दिवससुद्धां झाले नाहींत तर हा—हा विपरित प्रकार. माझ्या तोंडाला डांबर फासलंत ! तुम्हाला नाही, लोक जबाबदार धरणार मला. म्हणणार यानं—यानंच शिकवलं हें पोरांना. हा मवालीपणा, ही गुंडगिरी. वा ! वा रे पराक्रम ! गांवांत बायाबापड्यांचे हात धरा, टिंगल करा, त्यांची लाज काढा—— काय वाटलं? मी कौतुक करीन. स्वागत करीन ? अभिनंदन करीन तुमचं ? इडियट—बेअक्कल! युनियन बंद झाली तरी मला पर्वा नाही. रडा असेच, मरा, तडफडा. तुमची लायकीच ती! आधी दुसऱ्यांना मान द्यावयास शिका, म्हणजे तो तुम्हाला मिळेल! अन्यायाविरुद्ध झगडण्यापूर्वी प्रथम तुम्ही न्यायानं वागायला शिका ! शिस्तीनं आणि रितीनं चालायला शिका..."

"शाब्बास बेटा ! बरं वाटलं !" दाजी नावर मोठ्यानं ओरडला," "शिकव नीट भडव्यांना. ऐकत नसतील तर वहाणेनं फोड. पण थोडी माणुसकी येऊं दे..."

तेव्हां सावित्रीचं लक्ष गेलं. दाजी पुढ्यांतच फाटकावर उभा होता. "दाजी, तुम्ही ?" तिला आश्चर्य झालं.

"मीच चाललों होतों देवळाकडे वच्छीला बघायला. पोर आरास बघायला म्हणून गेलीय्. काळोख झाला तरी अद्याप नाही परतली."

"ताईबायना घरला पोंचवून ही आतांच आलें मी—" सावित्रीनं म्हटलं. पुढं अधिक बोलली नाहीं.

"जाते कुठं ? आपलंच गांव, धास्तीचं कारण काय ? सांगायचा मुद्दा रस्त्यावरून जात होतो तर ह्या विजयचा आवाज चढलेला ऐकला. म्हणून उभा राहिलों. आणि खरं सांगतों, बरं वाटलं. समाधान झालं. सावित्री, माझी एक चिन्ता कमी झाली. ह्या पोरांना हा बरोबर शिकवील..." म्हातारा दाजी उत्साहानं सांगूं लागला.

"हा—हा कमळीचा पोर वाटोळं करील गांवाचं." सावित्रीनं कडाकडा बोटं मोडलीं.

तसा दाजी एकदम खवळला, "काय कळतंय् तुला ? वाटोळं केलं तुझ्या त्या शेटानं, त्या गोळेसाहेबानं. भांचोद, गांवची मात्री माती केली. आणि त्या भडव्या अण्णानं. पुढारी म्हणे हा गांवचा. कवडीची नाही अक्लल ! उकीरडा झाला गांवाचा आणि गाढव तोच फुंकत पडलाय्.. आणि रांडे तूं—तूं सुद्धां...पण तुझ्याशीं बोलून काय फायदा? एव्हढा हा एकच पोर—काय नांव ह्याचं ? होय विजय—बरा दिसतो. पोरांनी देवळाकडे जरा दंगा केला वाटतं. कोणा बाईचा हात धरला. किंवा असाच काही वाह्यातपणा केला. आणि ह्याबद्दल विजय ह्यांची हजामत करतो आहे. ऐक, ऐक जरा ! तेच चाललंय् अजून. ह्याला मी पुढारी म्हणतों. निष्ठा हवी, निग्रह हवा, साधना हवी. आणि मुख्य म्हणजे चारित्र्य हवं..शुद्ध, निर्मळ...

पण सावित्रीनं त्याला पुढं बोलूं दिलं नाही. म्हटलं, "दाजी, पोरांनी देवळांत हात धरला तुमच्या लेकीचा——"

"आं ! वच्छीचा ? आमच्या—आमच्या वच्छीचा? कोणी ? कां?

"अन् ह्या भावणीच्या पोरानं नाही, तिला सोडवली मी—एका रांडेनं. खोटं तर गांवांत विचारा कोणालाहि...

"ह्या गांवांत आतां काहीसुद्धां होईल! होय, सावित्री, खरोखर" काळोखांत आकाशाकडे डोळे लावून दाजी उभा होता. चाफ्या बोडक्या झाडासारखा—प्रश्नार्थक चेहऱ्यानं...

☆ ☆ ☆

दोन दिवसांनी आतेबाईच्या नावांचं एक पत्र पोस्टमन कान्ताच्या हातांत दिलं. तो ओरडत माजघरांत आईपाशीं गेला, "आजोबाचं पत्र, आई—"

पत्र फोडून कान्ता तें वाचणार तर आतेबाई खेकसली, "तूं नको वाचूंस. दे इकडे. जरा चष्मा पण घे माझा."

आणि ती धडपडत उठून बसली.

पत्र मोठं नव्हतं. आणि आतेबाईनं तें पूर्णसुद्धां वाचलं नाहीं. फाडून तुकडे तुकडे केले.

"आई, हें काय? पत्र फाडलंस? आजोबांचं? कान्तानं विचारलं.

तशी डोळे फिरवून आतेबाई एकदम ओरडली, "मेला—मेला तो ! तुझा आजोबा, माझा बाप."

पत्रांतून आलेला हिरव्या रंगाचा एक कागद तिनं लेकाच्या अंगावर भिरकावला. सांगितलं, "हा चेक पण फाडून टाक. दोनशें रुपये, माझ्या औषधपाण्यासाठीं धाडलेत—बापानं माझ्या—"

नकारार्थी मान हलवीत कान्ता आईची समजूत काढूं लागला, "गरज आहे ह्यांची. तुझ्यासाठीं उंचीं औषधं आणतां येतील. तूं लवकर बरी होशील मग, चार दिवसांत आई, चार दिवसांत.

"कान्ता, अरे तूं कोणाचा मुलगा? दाजी नावराचा! छी:! फाड तो चेक—" आतेबाईनं बजावलं.

"पण कां? कां ग आई?" वासंतीनं विचारलं. म्हणजे हा काय प्रकार आहे तिला कळेचना.

"कारण, वच्छी ही भीक आहे. लेकीची बापाला किंमत नाहीं. तसं नसतं तर आज प्रसंगाला माझा हा लक्षाधीश बाप नुसती बातमी कळायची खोटी, धांवून आला असता. वेडी मी, म्हणून हॉस्पिटलांतून पत्र लिहिलं. आज बावीस दिवसांनी उत्तर. हें ..हें असं—जांवईबापू वेडेपणा करताहेत. यांत आम्ही भागीदार होऊं इच्छित नाहीं. मलत्याच इरेस पडूं नका. लिलावांत काय पदरांत पडेल तें पाडून घेणें. तुझी मागणी मी पुरी करूं शकत नाहीं. मग रागावलीस तरी हरकत नाहीं...माती न् मसणं! मी मागितलें होतें कर्जही—दहा हजारांचं. बापानं दिला हा डोस—व्यवहाराचा. आणि वर ही भीक दोनशेंची. ह्यांचं औषधपाणी करीन तर बरी झालें तरी रौरव नरकांत पडेन मी. नको—नकोच ! कान्ता, फाड तो चेक—"

कान्ता आढेवेढे घेऊं लागला. तशी आतेबाई झोपलेली ताडकन् उठली. मुलाच्या हातांतील कागद तिनं हिसकला. टरकावून चेकचे तुकडे तुकडे केले आणि तें तोंडांत टाकून चघळूं लागली. आणि मग पिशी कशी हंसत सुटली. हातवारे करीत वडबडत राहिली,

अनुक्रमणिका






घेतलं औषध. वच्छी थोडं पाणी आण. मग मला वरं वाटेल. बापाच्या दोनशें रुपयांचं असं औषधपाणी केल्यावर कां नाहीं वरी होणार—कां नाहीं?....

संध्याकाळला डॉक्टर नेहमीप्रमाणं आतेबाईला इंजेक्शन देण्यासाठीं आला तेव्हां वासंती मागीलदारीं सावित्रीशीं बोलत बसली होती. खालच्या आवाजांत दोघी कितीतरी वेळ कुजबुजत होत्या. वासंतीच्या हातांत एक बाटली होती. तो कसला तरी रस होता. औषधी असावा.

सावित्री सांगत होती, 'तायबाई, हें वध, मुकाट हा रस घे, आणि एकदाची मोकळी हो."

"पण जिवाला धोका तर नाहीं ?" वासंतीची शंका.

"माझ्यावर टाक विश्वास." सावित्रीनं म्हटलं, "आन् समज धोका असला तरी पण हा रस तुला घ्यायला हवाच. जिवापेक्षांसुद्धां अब्रू अधिक. सगळं बाकी शिकलीस, हें नाहीं कोणी शिकवलं?"

वासंती चरमली, गोंधळली, "नाहीं सावित्री, मला मरायचं नम्हीं."

"मरतीस कशानं? दोन महिनेच तर झालेत. एका दिवसांत साफ होशील."

"कांहीं नाहीं होणार? शप्पथ—गळ्याशपथ—"

"आन् झालं तर भोग." सावित्री बोलली, "तेव्हां वरं वाटलं. काय? थोडी कळ खा आतां!"

मागं दारांत द्वारकानाथ कुळकर्ण्याला पाहिलं आणि सावित्री झटकन् आडोशाला झाली. परसांत पार दिसेनाशी झाली.

द्वारकानाथानं खवचटपणं हंसून म्हटलं, "तरीच आतेबाईनं आज इंजेक्शन घेतलं नाहीं. डॉक्टराला परत धाडला. म्हणाली काही नको, वरं वाटतं मला. डॉक्टरसुद्धां खुळाच. तपासून म्हणाला गुण दिसतो खरा. पण नक्की नाहीं. एक्सायटमेन्टनं असं होतं. आणि मग एकदम उलटतं. . .तर हें असं आहे. गांवठी उपाय चालू आहेत."

"औषध आईसाठीं नाहीं. मला."

"कां ग ? काय होतं ?"

"काय करणार आहेस कळून." वासंतीनं उलट प्रश्न केला, "लग्न करशील—माझ्याशीं ? देवच पावला मग. हा रस नाहीं घ्यावा लागणार आणि जिवाचंहि बरंवाईट व्हायला नको."

"म्हणजे, मी नाहीं समजलों वासंती !" द्वारकानाथ दचकला होता. चांगलाच चरकला होता.

"अरे डोहाळे लागलेत—आतांतरी कळलं? पुरुषांना नाहींच कळणार. कारण हे लागतात बायकांना." वासंती विचूकपणं बोलली. आणि मोठ्यानं हंसली. फुगा फुटावा तशी.

आणि तसा द्वारकानाथ विनाकारण उखडला, "हंसायला काय झालं ? वेडपट—"

"दिवस गेलेत मला. लग्नाआधीं उद्यां गांव हंसणार. तेव्हां आज मी हंसतें—हंसून घेते रे."

"आणि मी काय करूं?"

"काही कर, पण असा चेहरा नको पाडूंस. तुला मी दोष देत नाहीं. उलट उपकारच तुझे. तूं नसतास तर मला वेड लागलं असतं."

"मला सांग वासंती—" द्वारकानाथ भारावून बोलला. घोगऱ्या, कांपऱ्या स्वरांत.

"काय?"

"मी—मीच का पहिला? का माझ्या आधी कोणी दुसरा पुरुष—" इतका चलाख, पण त्याला प्रश्न पुरा करता आला नाहीं.

"पहिला तूंच. आणि हें तुलासुद्धां ठाऊक आहे." वासंतीनं जाव केला," "विसरलास? आठव. जरा—"

आणि द्वारकानाथला आठवलं वाटतं. तो एकदम म्हणाला, "तयार आहे मी लग्नाला. माऊंची समजूत काढीन कशी तरी."

"वेडा तर नाहींस?" वासंती हंसत सुटली. काय लहरी पोर! तिला हा मोठाच विनोद वाटला. हंसूं आवरेनाच, हंसतच ती म्हणाली, "नाहीं, नाहीं. आधींच खूप उपकार झालेत तुझे. हें पोट जड झालंय् वध—"

आणि बोलतां बोलतां तिचा आवाज कठोर झाला. चेहरा उग्र

---

(पान ३२ वरून)

"हें नीरव वातावरण, हें सुगंध उजळणारं चांदणं, दवांत भिजलेली ही ओली रात्र पाहून सारं कांहीं आठवलं. तिच्या-माझ्या भेटीगांठीं, तिचं बोलणं आणि तिचा स्पर्श—क्षमा कर, पण तूं येण्यापूर्वी मी तिचाच विचार करीत होतों. आतां सारं संपलं—सारं कांही उव्वस्त झालं. म्हणूनच मी आतां तटस्थपणानं त्यांकडे पाहूं शकतों. भूतकाळांत जमा झालंय् सारं—पण कधींतरी वर उसळी मारतं. बेसावध, एकाकी मनाला दंश करतं—"

शरयू शांतपणें ऐकत आहे. माझ्या चेहऱ्याकडे अनिमिषपणें पहात. मग हळूच म्हणते— "मी जाणलं होतं हें सारं—तुम्ही न सांगतांच मी ओळखलं होतं की तुम्ही पोळलेले आहांत—"

"पण कशावरून?"

"तुमचं वाट पहाणं—पण त्यांत ओढ नसणं—! मी लवकर आलें तरीं सैरभैर होणं नाहीं, उशीरां आलें तरी खराखोटा रुसवा नाहीं. पहिल्यांदां स्पर्श केलांत—पण त्यांत धार नव्हती. त्यांत भोवंड आणणारी बेहोषी नव्हती. तो होता नुसताच स्पर्श. त्यांवरून मी ओळखलं—सारं कांहीं मनोमन जाणलं—"

मी तरदिशी उठून बसलों. तिच्या टपोऱ्या डोळ्यांत खोलवर पाहून म्हणालों—

"पण—पण तूं—तूं—"

मी प्रश्न पुरा करूं शकत नाहीं. शरयू कांहींच बोलत नाहीं. थंडपणानं दूर पहात रहाते. तिच्या डोळ्यांत नेहमी दिसणारी ठिणगी विझल्यागत होते. मी तिचे हात हातांत घेतों आणि गर्द झाडांवर ओथंबून राहिलेल्या चांदण्याच्या धुक्याकडे पाहूं लागतों....

●●●

झाला. ओठ उडूं लागले. त्वेषानं ती द्वारकानाथच्या अंगावर ओरडली, "हलकट साला! लग्न करतोय् माझ्याशीं. कां—माझ्या या शरीराचा लोभ नाहीं सुटत? मालकीच हवीय्! मेल्या, लग्न म्हणजे काय वाटलं तुला.? निव्वळ शरीरसंबंध नाहीं तो, फुकटांत घटकाभर चालणारी चैनसुद्धां नव्हे. उघड वाटणाऱ्या ह्या हिडीस व्यवहारापेक्षां कितीतरी भव्य, उदात्त अर्थ ह्या पवित्र विधींत आहे. दोन शरीरांचंच नाहीं तर अंतःकरणांचंसुद्धां मीलन असतं हें आणि तें होतं प्रेम असलं तरच! प्रेम—निष्कपट, निस्वार्थी, निसंःग! माझ्यावर आहे तें तुझं? असतं तर देवळांत पोरांनीं माझा हात धरला तेव्हां पळून गेला नसतास. जिवाची पर्वा न करतां त्या पोरांवर तुटून पडला असतास. जा, नीच! तुझ्याशीं लग्न करण्यापेक्षां मरून जाईन मी! हा—हाच रस पिऊन..

दुसऱ्या दिवशीं आतेबाईला जरा उशीराच जाग आली. डोळे उघडले तर बाहेर चांगलंच उजाडलं होतं.

"वच्छी—" तिनं लेकीला साद घातली.

उत्तर दिलं दाजीनं. वायकोला तो हंसून म्हणाला, "उठलांत? वरं झालं! येतो जाऊन. जमिनीचा लिलांव आहे चावडीवर."

"काय करणाराहांत?" आतेबाईनं सद्गदित आवाजांत विचारलं.

"लाज रवळनाथाला! तो करील कोणाला तरी उभा. बघूं या!" दाजीनं तुटक शब्दांत जाव दिला. लक्ष बाहेर, दाराकडे." नाहींतर करायला हवं कांहींतरी—कांहीतरी."

काय तें त्याला माहित नव्हतं. तो फक्त हाताची बोटं मोडीत होता. डोक्यांत अंदाज बांधीत होता.

"वरं! येतों मी."

"लवकर या. हिथं आतेबाई वाट पहात पडलीय् तुम्ही येईपर्यंत पाणी घेणार नाहीं तोंडांत. सांगून ठेवते."

"पाणीच मिळेल." दाजीनं हंसत सांगितलं," कारण वच्छीला वरं नाहीं. काळोखाच्या खोलींत पडलीय् कमर धरून. विटाळाची तक्रार. दुसरं कांहीं नाहीं. तुम्ही काळजी नका करूं."

दाजी बाहेर पडला तसा आतेबाईला तोंड धुण्यासाठीं गरम पाणी अन् तस्त घेऊन कान्ता माजघरांत आला. त्याच्याकडे आतेबाईनं चौकशी केली, "हे गेले काय रे?"

"हो! तुझा दागिन्यांचा डबा पण नेलाय् दाजींनीं."

म्हातारीच्या जिवाला भारी लागलं. नवरा तिच्याकडे शब्दानंहि बोलला नव्हता. एखाद्या चोरासारखा तिचा दागिन्यांचा डबा तो घेऊन गेला होता. जळ्ळा इतका अविश्वास—वायकोवर? आणि तोसुद्धां तीस वर्षे संसार केल्यावर? हेंच का चीज, फळ? बायकोची अजून खात्री असूं नये—शंका असावी? बोलला असता तर काय आतेबाईनं नाहीं म्हटलं असतं— मेलं शें—शंभर तोळे सोनं तें काय—जशी ही स्वतःच्या बोडक्यावर घालणार होती. किंवा आपल्या मढयाबरोबर मिरवीत घेऊन जाणार होती. छीः!

आणि झालं. आतेबाईच्या मनानं हेंच घेतलं. तिला मग दुसरा विचार उरला नाहीं. नाहीं तरी बऱ्याच दिवसांच्या आजारपणानं लहान पोरासारखी ती लहरी अन् हट्टी झाली होती. अंथरुणावर धाडकन् अंग टाकून ती कपाळ आपटूं लागली, गळा काढून रडूं लागली.

"आई, काय होतंय् ग? वरं का नाहीं?" कान्ता जाम घाबरला. तुझी आई मेली."

"नको ग—आई, नको असं बोलूंस."

"कशाला मेल्या? कोणाला किंमत नाहीं तर—तर अर्थ काय ह्या जिण्याला? त्यांचा—ह्यांचा विश्वा—इशवास ना—ना—ही रे मा—मा झ्या व—वर—" आतेबाईचा आवाज हळूहळू जड होत चालला. ओठ नुसतेच हलत होते. शरीर थरथरत होतं. हातापायांना दरदरून घाम फुटला होता. तळवे थंडगार पडत होते.

माजघरांत कान्तानं आकान्त लावला, "ताई, आई बघ कसंसंच करतेय्—कसंसंच—"

काळोखाच्या खोलींतून वासंती धावली. धड उभं राहवत नव्हतं. पाय लटपटत होते. पोटांत जीवघेण्या कळा लागल्या होत्या.

तिनं कान्ताला म्हटलं, "घाम पूस तो. तळवे चोळत रहा. गरम गरम कॉफी घेऊन मी येतेंच."

आणि वासंती तशीच धडपडत, कण्हत, अडखळत स्वयंपाकखोलीकडे वळली.

[क्रमशः]






# रथचक्र :  नवी आवृत्ति आणि प्रस्तावना

**श्री**. ना. पेंडशांच्या गाजलेल्या 'रथचक्र' कादंबरीची दुसरी आवृत्ति अवघ्या दोन वर्षात निघाली. "माझी सर्वात यशस्वी कादंबरी" असे जिच्याबद्दल स्वतः कादंबरीकार टीकाकारांच्या नाकावर टिच्चून म्हणतात—ती ही 'रथचक्र'. 'रथचक्र'च्या पहिल्या आवृत्तीला कादंबरीकारांना प्रस्तावना लिहिण्याचें कांहीं प्रयोजन वाटलें नव्हतें. पण दुसऱ्या आवृत्तीच्या निमित्तानें 'रथचक्र' संबंधीच लिहिण्या-बोलण्याची वेळ त्यांच्यावर आली व म्हणून या दुसऱ्या आवृत्तीला त्यांनीं आत्मप्रकटीकरणात्मक प्रास्ताविक जोडलें आहे.

ह्या प्रास्ताविकाचे दोन भाग आहेत. आपण लेखक कसा झालों याचें केव्हां केव्हां कादंबरीकारांना आश्चर्य वाटतें त्यावर त्यांनी पहिल्या भागांत लिहिलं आहे. मराठी कादंबरीच्या विकासांत त्यांना तीन टप्प्यांचें महत्त्व वाटतें. पहिला हरिभाऊंचा. दुसरा प्रा. फडक्यांचा व तिसरा विश्राम बेडेकरांच्या 'रणांगणा'चा. पु. शि. रेग्यांच्या 'सावित्री'चे यशही ते तिसऱ्या टप्प्यांत मोजतात. मराठी कादंबरीच्या विकासांत स्वतःला कांहीं स्थान आहे कीं नाही याचा त्यांनीं विचार केलेला नाहीं व त्यांत त्यांना स्वारस्यहि वाटत नाहीं. उलट कादंबरी ह्या वाङ्मय प्रकाराविषयीं त्यांच्या कांहीं निश्चित कल्पना आहेत त्याप्रमाणें गेल्या दहा वर्षात आपण कांहीं फारसे केलेलें नाहीं ही एकच गोष्ट ते स्वतःला बजावीत आलेले आहेत. त्यांना एकच समाधान लाभलें आहे तें म्हणजे 'एल्गार' ते 'रथचक्र' ह्या प्रवासांत दरवेळीं मुंगीच्या पावलानें कां होईना त्यांची प्रगति होत आहे.

हा प्रास्ताविकाचा पहिला भाग.

दुसऱ्या भागांत 'त्यांनीं' 'रथचक्र'च्या संदर्भात विशेष आत्मकथन व भावकथन केलें आहे. या प्रास्ताविकांतील सारे विचार 'अभ्यासा-पेक्षां अनुभवांतून निर्माण झालेले' आहेत व ते 'मुख्यतः रसिकांकरितां' आहेत.

प्रश्न असा पडतो कीं, हें प्रास्ताविक खरोखरच केवळ रसिकां-करितांच लिहिण्याची गरज लेखकाला वाटली का ? व ती कां वाटली ? 'रथचक्रा'वर मराठींतील टीकाकारांनी जी टीका केली त्या टीकेचा परामर्श घ्यावा असें श्री. ना.ना वाटलेंच नाहीं कीं काय ? कीं त्या टीकेचा परामर्श घेण्यासाठीं म्हणून कांहींशी (किंवा बरीचशी) त्वेषानें बैठक मारल्यावर व बराचसा घोळ घातल्यावर रसिकांची आठवण बऱ्याचशा वेळानें पेंडशांना झाली असावी कीं काय ?

पेंडशांच्या या कादंबरीवर जी बरीचशी टीका झाली ती प्रतिकूलच होती हें स्पष्टपणें पेंडसे जाणतात. विशेषतः या कादंबरीवर टीकेची झोड उठली ती 'कृष्णाबाई'च्या प्रकरणामुळें. या कादंबरीतील अश्ली-लता ठळकपणें विचारांत घेतली गेली ती कृष्णाबाईच्या संदर्भातच. शिवाय या कादंबरींतील 'भोंगळ' शब्दांवरही टीकेचा मारा झाला. 'रथचक्र' ही पेंडशांची उत्कृष्ट कीं निकृष्ट कादंबरी, असामान्य कीं सामान्य कलाकृति, कीं अश्लील कलाकृति, असे प्रश्न विचारण्यांत आले व बहुमतानें खरें म्हणजे 'रथचक्र' ही सामान्य प्रकारांतच गणिली गेली, अशी वस्तुस्थिति आहे. पेंडशांनी कांहीं नवीन सांगितलें नाहीं, जुनेंच नव्यानें सांगण्याचा खटाटोप केला, पण तेंही त्यांना धड जमलें नाहीं, उलट 'कृष्णाबाई'चें उसने परकीय ठिगळ आपल्या कलावस्तूला ओंगळपणें चिकटवून त्यांनी आपली कलाकृति वाटगी व बेडौल केली असाच सर्व समीक्षणांचा सर्वसामान्य सूर होता.

आजवर आपल्या कादंबऱ्यावर आपण कांहीं बोलूं नये असें वाटून पेंडसे अबोल राहिले होते; पण ह्याच कादंबरीच्या वेळीं आपली भूमिका कोणती तेवढेंच सांगण्याची मर्यादा पेंडसेना कां पाळावी लागावी ? पेंडशांच्याच शब्दांत सांगायचें तर "त्यांच्यांत (कादंबऱ्यांत) ताकद असेल तर त्या उभ्या राहतील." मग 'रथचक्र' मध्यें तशी ताकद नाही हें टीकाकारांचें म्हणणे पेंडशांना पटलें असावें म्हणून तर त्यांना स्वतःच आपली 'रथचक्र' सारखी उभी राहिली कीं न राहिली असा संभ्रम पडला नसेल ना ?

नाहींतर रसिकांना उद्देशून कणभर बोलतां बोलतां मणभर राग त्यांनीं टीकाकारांवर काढला नसता. आणि तो सुद्धां केवळ नुसता राग. बरीचशी आग पण ते पाखडतात व 'जितं मया' च्या आवेशांत 'रथचक्र' अश्लील कीं भोंगळ हें ठरविण्याचा हक्क रसिकाला बहाल करतात व त्याच्या विचाराला किती महत्त्व द्यायचें हें ठरविण्याचा हक्क स्वतःकडे घेऊन ठेवतात.

म्हणूनच वाटतें कीं मुळांतच पेंडसे यांनी दुसऱ्या आवृत्तीला प्रास्ताविक लिहिण्याचा खटाटोप टाळला असता तर किती बरें झालें असतें ! झांकली मूठ सव्वा लाखाची राहिली नसती काय ? खरोखर आपली मूठ अनाठायी उघडून श्री. ना. पेंडसे यांनी ती अगदींच स्वस्त करून टाकली असेंच म्हणावेसें वाटतें.

पेंडशांच्या निवेदनाचें थोडक्यांत वर्गिकरण करण्याचा प्रयत्न केला तर हातीं काय पडतें ? पाहूंया.

— त्यांच्या एका मित्रानें पूर्वीच एका ओंगळ शब्दाबद्दल घेतलेला आक्षेप नंतर कसा त्याला चुकीचा वाटला हें पेंडसे सांगतात.

— नंतर पेंडसे सौंदर्यवादामध्यें शिरतात. क्षणिकच. व म्हणतात कीं ज्याचें त्यानें आपापले निष्कर्ष काढावेत व स्वस्थ बसावें.

— मग कुणी विख्यात टीकाकारानें प्रादेशिक कादंबऱ्याच लिहूं नयेत असें म्हटल्यावरून ते मेस्त्री व कादंबरीकार यांची तुलना करतात. मेस्त्रीला फर्निचर कसे करावे या सूचना देणाऱ्याच्या वर्गांत या टीकाकाराला ते घालतात व म्हणतात कीं असल्या सूचना करणारे वस्तुतः कलेच्या मुळावर आलेले असतात.











Pratibha 643

— त्यापुढें जाऊन 'तुम्ही कां लिहितां ?" असा लेखकाला नेहमी प्रश्न विचारला जातो त्याचें, त्याचें त्यालाच (लेखकाला) न कळलेलें उत्तर देण्याचे ते प्रयत्न करतात.

— 'लेखकाचा पिंड असेल त्याप्रमाणें त्याची निर्मिति असणार' असें नंतर सांगून 'लेखक जें विश्व निर्माण करतो त्याचे कायदे असतात' बंधनें असतात. हीं दोन्ही सहज असतात.' असें पेंडसे आपलें म्हणणें मांडतात. व पुढे म्हणतात कीं 'त्या कायद्यांचें व बंधनाचें पालन लेखक करतो आहे कीं नाही हें मी पाहतों. ....जीवनाचे तो किती सखोल दर्शन घडवीत आहे हें मी पाहतों.

— कृष्णाबाईच्या व्यक्तिरेखेभोवती वाद माजणार अशी लेखकाची अटकळ होती पण तिला अश्लील ठरविलें जाईल अशी त्यांची अपेक्षा नव्हती.

— हें सर्व सांगून झाल्यावर व 'कृष्णाबाई'च्या प्रकरणाचा विशेष उहापोह आपल्या परीने केल्यावर ते स्पष्टपणे लिहितात कीं ज्या एका गोष्टीमुळें कृष्णाबाईचें प्रकरण त्यांना अपरिहार्य वाटत होतें त्याचा विचार करतां **बांडगुळा**सारखें तें कादंबरीला चिकटून रहाणेंच योग्य होईल असेंहि त्यांना वाटले. 'रथचक्र' कादंबरीची मूळ कल्पना देऊन... "ह्याच नियतीचा 'कृष्णाबाई' हा एक भेसूर ओंगळ आविष्कार होता." असें ते म्हणतात.

ही त्यांची भूमिका.

पण ह्या सर्व निवेदनांत आत्मकेंद्रित आत्मनिष्ठेबरोबरच टोचतात व बोंचतात ती वस्तुरूप विसंगतीची वेडीवाकडी वर्तुळें. उदाहरणार्थ आपली भूमिका सांगून संपवितांना ते शेवटीं म्हणतात, "कृष्णाबाई असंभाव्य वाटूं नये आणि मूळ कथानकाशीं ह्या प्रकरणाचा धागा सहजपणें मिळून जावा एवढें बंधन मी आवश्यक समजत होतो." तर अगोदरच एके ठिकाणीं ते म्हणतात, "तें प्रकरण **बांडगुळा**सारखें कादंबरीला चिकटून राहणेंच योग्य होईल असेंहि वाटतें—"

ओंगळ शब्दांकडे पाहण्याची आपली दृष्टि ते व्यक्त करतात, तें एक ठीक म्हटलें तरी एका 'पोरकट' प्राध्यापकावर ते एवढे काय म्हणून संतापतात ? 'पोरकट' पणाकडे अगदींच दुर्लक्ष करणें त्यांना अगदींच अशक्य (कीं असह्य) कां वाटलें ? 'ओंगळ' शब्दांना घाबरणाऱ्या लोकांसाठीं त्यांनीं उद्धृत केलेल्या ओळींतून त्यांना कमालीचें असें जें सुचवायचें आहे, तीच त्यांची शब्दसंकेताची परिसीमा मानायची काय ? आणि 'ओंगळ' शब्दांना घाबरले आहेत तरी कोण ? घाबरतात म्हणून टीकाकार 'ओंगळ' शब्दांवर आक्षेप घेतात ? शेवटीं क्रुद्ध झालेले पेंडसे आक्षेपकांना 'पुस्तकी माणसें' असा शेलक्या शब्दांचा आहेर देऊन आत्मसंतुष्टींत रममाण होतात. व मगच त्यांना रसिक आठवतात ? सांप्रतच्या नितिरक्षकांकरवीं पुनः कुणी एखादा 'मर्ढेकर' बळी पडूं नये म्हणून पेंडसे फार तळमळतात.

म्हणजे झालें आहे काय कीं, पेंडसे 'रथचक्रा' बद्दल बोलायला गेले आणि आपल्याशीच भांडत व तंडत बसले व अश्लीलतेसारख्या सामाजिक, नैतिक व कलाहीन समस्येशी व ती समस्या चिवडीत बसणाऱ्या नीतिरक्षकांशीं ? वास्तविक आपली लेखणी पेंडशांनीं आणखी एखादी नवी कादंबरी लिहिण्यासाठीं तरी वापरायची किंवा परजून (?) तरी ठेवायची किंवा अगदींच काहीं नसलें तर 'म्यान' तरी करून ठेवायची ! ती त्यांनीं उगारली आपल्या आक्षेपकांवर तलवारीच्या अभिनिवेशांत व आपणच आस्थेने घेतलेल्या आत्मनिवेदकाच्या भूमिकेची त्यांनीं आपल्याच लेखणीने सफे कत्तल केली. कादंबरीकारानें आपल्या कादंबरीवर बोलूं नये हीच भूमिका किती चांगली होती ? किती लाख मोलाची होती ? 'रथचक्र' च्या दुसऱ्या आवृत्तीला आपल्या पहिल्याच प्रास्ताविकाचें हें ठिगळ न जोडण्याचा संयम कादंबरीकार श्री. ना. पेंडसे यांनीं कटाक्षाने व प्रामाणिकपणें पाळायला हवा होता. भविष्यकाळांत हात दाखवून अवलक्षण केल्याचा आरोप कुणा उद्यांच्या टीकाकारानें त्यांच्यावर केलाच तर पुन: काय 'रथचक्र'च्या तत्कालीन आवृत्तीला प्रास्ताविकाची प्रतिजोड देऊन श्री. ना. पेंडसे 'आपली भूमिका' मांडतच राहणार आहेत ? आपल्या मूळ व रास्त भूमिकेपासून श्री. ना. पडसे ढळलेच कां ? (कीं चळलेच ?)

—**सारस्वत**

(**उत्तर दिग्विजय**—पान ७ वरून)

करण्यासाठीं इथले हे श्रमिकदेखील सुरावर गद्य गाणें म्हणत आहेत.

देशपांडयांनीं त्या लयबद्ध गाण्यांत कांहीं वेळ लक्ष गुंतविलें. मी मळके पायमोजे धुतले व वाळविले, तरीहि चहाचा पत्ता नाहीं. तिथल्या "बेऱ्या" पाशीं व्यक्तिशः व संघशः चहा नामक पेयाविषयीं आम्ही चौकशी केली. त्याचा तुटकपणा "जनपथ"वर ताण करणारा होता.

"चहा वगैरे येथें कांहीं मिळत नसतो." त्यानें रोकडें उत्तर दिलें.

"वा वा ! असें कसें ? डाक बंगल्यांत चहा मिळतो" वगैरे आम्ही बोलून पाहिलें. पण त्याचा ठेका एकच—

"येथें चहा मिळणार नाहीं."

"आम्ही पाहुणे आहोंत. आमची सर्व व्यवस्था येथें होईल असें आम्हांला साहेबांनीं सांगितलें आहे." ह्यासारखा बुद्धिवाद आम्ही बराच वेळ केला. त्यावर उत्तर मिळालें,

"पैसे द्याल तर बाहेरून चहा आणून देतों."

आणि शेवटीं बाहेरच्या कुणा उपहारगृहांतून आणलेलें द्रावण आम्ही प्राशन केलें. एव्हांना अकरा वाजून गेले होते. लेह ग्रामाची वास्तपुस्त करावी म्हणून मी बाहेर पडलों. गांव लहानसेंच आहे. गांवांत चढउतार आहेत लेहच्या राजाचा उंचावरचा उंच निवास गांवाकडे वरच्या मानेनें बघतो. (हे राजेमहाशय पुढें आम्ही एका छावणींत पाहिले. ते भारतीय सेनेंत अधिकारी आहेत) गांवांतून स्वच्छ पाण्याचे प्रवाह खळाळत जातात. हें पाणी डोंगरावरून येतें. वितळत्या बर्फाचें हें थंडगार पाणी. पाण्याकडे पाहूनच तहान भागते. ह्या पाण्याच्या आधारावर हिरवेपणा जगतो. एरवी सर्वत्र करडेपणा. कोरडेपणा. धूळ, आणि दगडगोटे. त्या दगडगोटयांतून शक्तीचा अपव्यय न करतां एकेक पाऊल टाकत मी गांवांतल्या मुख्य मार्गापर्यंत गेलों..

एके ठिकाणीं लडाखी पौरजनांचा बराच मोठा घोळका जमलेला दिसला. वाटेवर पाणी सांडलेलें होतें. जळकीं लाकडें व कापड विखुरलेलें दिसत होतें. आदल्याच रात्रीं एका घराला आग लागली होती. बर्फभरल्या हिमालयांत आग लागूं शकते हें मला खरेंच वाटेना. पण आग लागली होती खरी. आग लागली होती व विझलीहि होती. सभोंवार माणसांचे थवे रेंगाळत होते. तांबूस पंखांच्या पांखरांप्रमाणें ते थवे दिसत होते. त्या साऱ्या स्त्रीपुरुषांनीं एकजात गुलाली (मरून) रंगाचे पायघोळ झगे घातले होते. त्यांच्या डोक्यावर दोन टोंकें असलेल्या पालथ्या गंजाप्रमाणें दिसणाऱ्या टोप्या होत्या. पुरुषांच्याहि गालावर केस अतिशय विरळ होते, किंवा नव्हतेहि. आणि त्यांच्या गालांचा रंग एखाद्या रसरशीत सफरचंदासारखा होता. मुलांच्या चेहऱ्याविषयीं बोलायलाच नको. टिचकी मारली तर रक्त निघेल असे त्यांचे लालबुंद चेहरे होते. लडाखी लोकांचें चालणेंहि कांहीं वेगळें होते. दोन्ही अंगांनीं होडीप्रमाणें डोलत डोलत, आणि पुढें थोडेसें वांकत वांकत दुडक्या चालीनें हीं माणसें चालतात. (त्यांची ती चाल माडगूळकरांनीं तत्काळ आत्मसात् केली व तसेंच ते चालूं लागले) पाठीवर ओझीं वाहण्याच्या प्रघातामुळें लडाखी माणसाला त्यांची ही चाल मिळाली असावी. त्यांचे ते अनेक स्वल्पविराम घेत दुडकत चालणें, त्यांचें तें पायघोळ रंगीत नेसणें, त्यांचें तें आम्हांला अज्ञात बोलींत बोलणें, आणि त्यांचें तें वेगळ्या शरीरवर्णामुळें वेगळें दिसणें, ह्यामुळें आपण एका वेगळ्या जगांत असल्याचा साक्षात्कार होत होता. इथला निसर्ग वेगळा होता. झाडें-झुडपें वेगळीं होतीं. घरें वेगळीं होतीं, वर्तमानक्रम व पद्धति वेगळ्या होत्या. येथें स्वयंप्रेरिकांचे कर्णे नव्हते, फेरीवाल्यांचें ओरडणें नव्हतें, स्थानिक गाड्यांचें खडखडणें नव्हतें कीं घड्याळाशीं जखडलेल्या माणसाची धांवपळ नव्हती. सारें कसें शांत होतें.

जळक्या घरासमोरील माणसांचें बोलणें हें केवळ शांततेच्या त्या अथांग सागरावरील क्षणिक बुडबुड्यासारखें होतें. तरीहि हा होता हिंदुस्थानच. होता भारतच. अनेकतेंत एकता साधणाऱ्या भारतीय महावृक्षाचीच ही एक शाखा होती. ज्या सूत्रानें बंगाली व मऱ्हाठा बांधलेल्या होता, ज्या सूत्रानें राजपूत, पंजाबी, तामिळी व बिहारी बांधलेला होता त्याच सूत्रानें हा लडाखी माणूसहि आमच्याशीं बांधलेला होता. राष्ट्रधर्माचें तें सूत्र होतें. लडाखचीं धर्मस्थानें आम्हांला वेगळी वाटत नव्हतीं. 'ॐ नमो पणिभद्राय' हा मंत्र आम्हांलाहि परका नव्हता. कपिलवस्तूचा सिद्धार्थ, शुद्धोदन–मायावतीचा सुपुत्र, हा आमचा अवतारी पुरुष होता, व त्यांचाहि परात्पर गुरु तोच होता. आम्ही एक होतों. आमचीं सुखदुःखें, आमचे शत्रु-मित्र, आमचे स्वार्थ-परमार्थ एक होते. एक असणें प्राप्तच होतें. एरवी लडाखला चीनचा चटका बसला म्हणून महाराष्ट्रानें कळवळण्याचें कारणच काय होतें? आम्ही येथें येण्याचें कारण काय होतें ?

विचार करीत मी परत फिरलों. भुकेची भावना मला होऊं लागली होती. "प्रारंभीं तरी तुम्हांला भूक लागणार नाहीं." हें भवितव्य माझ्या विषयीं तरी खोटें ठरूं पहात होतें. किंचित् गति वाढवून मी निवासस्थानाच्या दिशेनें चालू लागलों. तोंच शुभ्र दाढींतला एक लडाखी वृद्ध स्मित करीत समोर आला. व शुद्ध हिंदुस्थानींत त्यानें मला प्रश्न केला, "तुम्ही कुठचं ?"

"मुंबईचे !" मी मुंबई-नागपूर हा भेद विसरून उत्तर दिलें.

"कसे आलांत ?"

"देश पहायला !"

"मी तुमची कांहीं खिदमत करूं शकतो काय ?"

"धन्यवाद ! तूर्तास आम्हाला कांहीं नको."

"कांहीं चहा वगैरे ? इथला चहा वेगळा असतो. चला घरीं. जरा पिऊन तरी पहा !"

चहाचें नांव निघतांच मी मनोमन हंसलों व म्हणालों,

"पुन्हां केव्हांतरी. आमचा चहा हा आतांच झाला आहे."

गुलाबी झगा, दोन टोकाची टोपी व शुभ्र दाढी व उंच गालशेंडे असलेल्या लालबुंद चेहऱ्याच्या त्या म्हाताऱ्याकडे मी आपादमस्तक पाहिलें, व त्याला विचारलें,

"आपण मुसलमान काय ?"

"होय !" त्यानें उत्तर दिलें.

"आपली मातृभाषा कोणती ?"

क्षणभर तो वृद्ध थबकला व म्हणाला, "उर्दू-हिंदी !" मग त्यानें मला मृदु आश्वासनपर स्वरांत सांगितलें, "मात्र इथें आमच्यांत मांडणतंटा अगदी नाहीं हां ! बुद्ध व मुसलमान भावाभावाप्रमाणें राहतात."

त्याचे ते शब्द ऐकून मला संतोष वाटला. येथें मुस्लीम–नामुस्लीमांचीं भांडणें नव्हतीं. ही गोष्ट आनंदाची नाहीं तर दुसरें काय? लडाखमधील बुद्ध व मुस्लीम एकाच वंशाचे होते. एकाच रक्ताचे होते. (जसे पंजाबी मुस्लिम व पंजाबी हिंदु, किंवा बंगाली मुस्लिम व बंगाली हिंदु एकाच रक्ताचे आहेत.) ते दिसतातहि सारखे. ह्या भारदस्त म्हाताऱ्याला भाषा, दाढी ह्यासारख्या कारणामुळें मी मुसलमान म्हणून ओळखला. लडाख हा सामान्यतः बुद्ध वस्तीचा प्रदेश म्हणून आपण ओळखतों. परंतु पुढें श्रीनगरांत एका काश्मिरी वृत्तपत्रकारानें मला सांगितलें कीं लडाखमध्यें बुद्ध व मुस्लीमांची संख्या जवळ जवळ सारखी आहे. म्हणजे, तो म्हणाला, सरासरी चव्वेचाळीस सहस्र बुद्ध धर्मीय आहेत व चाळीस सहस्र मुसलमान आहेत.

"परंतु पुढील दहा वर्षांत लडाख हा मुस्लीम बहुसंख्येचा प्रांत होईल." त्यानें भाकित केलें.

"कां ?" मी विचारलें.

"कारण बुद्धधर्मीयांत लामावाद प्रबळ आहे," तो काश्मिरी पत्रपंडित सांगूं लागला." ते ब्रह्मचारी राहतात. आंतरधर्मीय लग्न प्रचलित आहे. म्हणजे बुद्ध मुली मुसलमानांशीं लग्न करतात व इस्लाम धर्म स्वीकारतात. मुसलमान मुलींनीं बुद्धधर्मीयांशीं लग्न करून बुद्ध धर्म स्वीकारावयास चिंता नाहीं परंतु..."

त्याचें म्हणणें मला समजलें. एकूण बुद्धधर्मीय व मुसलमान येथे गुण्यागोविंदानें नांदत होते. उत्तम गोष्ट ! मला चहाचें निमंत्रण देणाऱ्या त्या परोपकारी वृद्धाचें बोलणें माझ्या कानांत घुमत होतें. त्याचे

अनुक्रमणिका

सुंदर शब्द व सुंदर चेहरा आठवीतच मी निवासस्थानीं येऊन पोहोंचलों. तों तेथें पोटाचा प्रश्न घसास लागल्याचें दिसलें.

"येथें जेवण मिळणार नाहीं." मघाचाच "वेरा" मघाच्याच ठेक्यावर मघासारखेच शब्द बोलत होता. पु. ल. देशपांडे पोटतिडकीनें त्याचें हृदयपरिवर्तन करण्याचा प्रयत्न करीत होते. "देशभर डाकबंगल्यांतून जेवण मिळत असतें. येथें आपली सर्व व्यवस्था होईल असें आम्हांला सांगण्यांत आलें आहे. असें असता—"

श्री. पु. ल. दे. शब्दांचें व आविर्भावाचें सर्व सामर्थ्य पणास लावीत होते. पण मुंबईसह महाराष्ट्र जिंकणाऱ्या ह्या उत्तम पुरुषाला तो वेरा कांहीं बधत नव्हता. तो मुळीं आम्हांपैकीं कुणालाच दाद देत नव्हता. माडगूळकर येवढे माणदेशांतले वाघ ! कानेटकर येवढे नाटककार! सवनीस येवढे लेखणीबहाद्दूर ! पण तो बबर्जीबच्चा कांहीं ह्या संयुक्त अघाडीला ऐकत नव्हता. आमचें एकेकट्यानें बोलून झालें, सामुदायिक बोलून झालें, नरम बोलून झालें, गरम बोलून झालें. पण तो आपलेंच ध्रुपद आळवीत राहिला, "येथें जेवण मिळणार नाहीं.'

मध्यंतरीं एक उंच गोरा पतलून घातलेला गृहस्थ येऊन गेला. "तुम्हीच का मुंबईचे पाहुणे ?" असा त्या चाकरमान्यानें थंड स्वरांत प्रश्न केला व तो आला तसाच निघून गेला. पुढें कळलें कीं हाच इथला सर्वेसर्वा, निवासस्थानावर राज्य करणारा 'ओव्हरसिअर' तो लडाखी तर नव्हताच. पंजाबी व काश्मिरी असेल. काश्मीर शासनाचा तो सेवक होता. आमचें तो कांहींच देणें लागत नव्हता. चमत्कारिक प्राण्याकडे पहावें तसें आम्हांकडे ओळीनें पाहिलें. पुनश्च एकदां 'वेऱ्या'शीं युद्ध खेळावयास आम्हांला मोकळे करून तो चालता झाला.

ह्या प्रकाराला मी कंटाळलों. श्रीनगरहून दूरदर्शी देशपांड्यांनीं कांहीं फळें आणलीं होतीं. तीं मक्षण करीतच ते बोलत होते. मीहि (आम्ही सर्वांनींच) त्यांना हातमार लावला व मग हातपाय पसरून (आणि पांघरूणें लपेटून) स्वच्छ ताणून दिली.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे मला क्षणार्धांत झोंप लागली. चहा व जेवणाचे वांदे असले, तरी पलंग मोकळा होता. "वेटा" मला तेथूनहि हुसकावून लावतो कीं काय, अशी शंका येते न येते तो त्या शंकेसकट मी झोंपेंत बुडालों.

बऱ्याच वेळानें मी जागा झालों. तेव्हां सरासरी दोन वाजायला आले होते. देशपांडे मला म्हणत होते, "दादा तुम्ही आपले खुशाल झोंपलांत !"

"काय करूं मग ?" मी उत्तरलों. "तेवढीच एक गोष्ट माझ्या हातची होती!"

ते शब्द मी बोललों व मला आनंदाची एक उकळी आली. मला झोंप लागली होती. अगदी गगनभेदी लडाखमध्यें मी घरच्यासारखा घोरत पडलों होतों. 'पहिल्या रात्रीं तरी तुम्हांला झोंप लागणार नाहीं.' हें भाकित माझ्या विषयांत साफ खोटें ठरलें होतें. पहिल्या रात्रीं काय, पहिल्या दिवशींच मला झोंप लागली होती. आणि तीहि भर दुपारीं ! मला झोंप लागली होती येवढेंच नव्हे तर मला चांगली कडकडून भूकहि लागली होती. महाराष्ट्राच्या अन्नपाण्यावर पोसलेल्या माझ्या पूर्वजदत्त प्रकृतीचें कौतुक करीत मी देशपांड्यांना पुसलें, "का हो देशपांडे, भोजनाची काय व्यवस्था ?"

"होते आहे व्यवस्था "देशपांडे उपरोधानें म्हणाले." मैत्र साहेबांना फोन करून आपली अवस्था कळविली आहे. ते स्वतः इकडे येणार आहेत. तोंवर हॉटेलांतून आपलें जेवण येईल असें वाटतें."

"हॉटेलांतून ?" मी डोळ्यावरची झोंप झाडीत उद्‌गारलों.

"हो हॉटेलांतून. ज्या होटेलांतून चहा आला त्याच हॉटेलांत जेवणाची ऑर्डर गेली आहे. येवढ्यांत जेवण यावें."

—त्याप्रमाणें जेवण झालें. डाकबंगल्यांतलें नव्हे; हॉटेलांतलें. बराचसा भात व मांसाचे तुरळक तुकडे असलेलें कालवण. 'इथें जेवण मिळत नाहीं.' हे आपले शब्द वेऱ्यानें खरे केले होते. त्यानें आम्हांला पाणी मात्र दिलें. मख्ख चेहऱ्यानें तो आमच्या भोंवतीं वावरत होता. त्याच्या अध्यक्षतेखालीं आमचा भोजनसमारंभ पार पडला.

ही अन्न आघाडी पु. ल. देशपांडे ह्यांनीं लढविली होती. सवनीसांची त्यांना नेहमींप्रमाणें कुमक होती. माडगूळकर व कानेटकर देशपांड्यांच्या उपक्रमशीलतेचें कौतुक करीत होते. आम्ही साऱ्यांनीं देशपांड्यांना आशीर्वाद दिले. त्यांनीं समवेत आणलेल्या फळाविषयीं व मिळविलेल्या जेवणाविषयीं. पोटांत गेलेले ते मासखंड कुणाचे असतील, ह्याविषयीं आम्ही चर्चा करीत बसलों. कोंबडी, बोकड, ह्यासारखे कुणी परिचयांतलें ते वाटत नव्हते. हा 'याक तर नसेल ?' असे प्रश्न आम्ही परस्परांना विचारीत असतांच लेफ्टनंट कर्नल मैत्र तेथें येऊन पोहोचले. ते अस्वस्थ दिसत होते. त्यांच्या पाठोपाठ "मुंबईचे पाहुणे ते तुम्हीच का ?" असा एकच प्रश्न विचारून अंतर्धान पावलेले ते ओव्हरसियरबावूहि तेथे येऊन पोहोंचले. त्यांना पाहतांच मैत्र महाशय अधिक अस्वस्थ झाले.

त्या दोघांचें सारेंच बोलणें येथें देण्यांत अर्थ नाहीं. मैत्र महाशयांनीं ओव्हरसियर बाबूंना विचारलेला मुख्य प्रश्न असा होता.

"पाहुण्यांची सर्व व्यवस्था करतों असें वचन तुम्ही मला दिलें असतांहि तें वचन पाळलें कां नाहीं ?"

ओव्हरसियर बाबूंपाशी ह्या प्रश्नाला चांगलेसें उत्तर नव्हतें. तेव्हां त्यांनीं उर्मटपणाचा आश्रय केला व ते गुरकावले,

"तुम्हांला काय करायचें तें करून घ्या ! मी तुम्हाला उत्तरदायी नाहीं." दिलेलें आश्वासन निःशंकपणें मोडणारा एक ओव्हरसियर परक्या पाहुण्यासमोर एका वरिष्ठ सैनिकी अधिकाऱ्याला हें उत्तर देत होता. देऊं शकत होता. तें उत्तर ऐकून संयम राखणें कठीण होतें. पण तो संयम मैत्र महाशयांनीं दाखविला. त्या इवल्याशा माणसाशीं अधिक तोंडातोंडी करणें त्यांना योग्य वाटलें नाहीं.

त्यानंतर त्यांनीं कृति केली. सामानासकट आम्हाला छावणीकडे हलविण्याचा निर्णय त्यांनीं तेथल्या तेथें घेऊन टाकला. लेह नगरांतला आमचा रहिवास अशाप्रकारें कांहीं तासांत संपला. चहाच्या पेल्यांतल्या वादळाची ही अशी समाप्ति झाली.

(क्रमशः)



अनुक्रमणिका

(पान १०८वरून)

प्रश्न :— तरीही चित्रपट व्यवसाय—पटकथा लेखन आपल्याला आवडतें?

भावे — अवश्य आवडते. आवडण्यासारखेंच तें माध्यम आहे.

प्रश्न —आपल्याला नाटकाची प्रेरणा कुणीं दिली ! कशी मिळाली !

भावे — माझ्या वडिलांना नाटकाचा भारी शोक होता. त्यामुळें मला लहानपणापासून नाटकें पहायला मिळत होतीं. मलाही नाटकें आवडत. लिहावेसें वाटे. मग लिहून टाकलें नाटक – 'विषकन्या' ! चिंतामणराव कोल्हटकर मला म्हणाले "तुम्ही नाटक लिहाल. तुम्ही लिहा." आणि मी लिहिलें.

प्रश्न — मग त्यांनीं तें रंगमंचावर आणले कां नाहीं ?

भावे — कांहीं व्यावहारिक अडचणींमुळें तें घडलें नाहीं खरें ! पण ते स्वतः, कुसुम देशपांडे व पु. ल. देशपांडे ही मंडळी त्यांत कामें करणार होती. पु. ल. देशपांडे विलासची भूमिका करणार होते.

प्रश्न — नंतर तें रंगमंचावर कुणी आणलें?

भावे — सावकार बंधूंनीं १९४७ सालीं तें रंगभूमीवर सादर केलें. गोपीनाथ, ललिता पवळेकर, जयराम शिलेदार हा संच होता. पुढें मग मास्टर नरेश विषयेची ती भूमिका फार चांगली करीत असे. पण माझ्या मतें 'विषकन्ये' चा उत्तम प्रयोग असा अजून झालाच नाहीं. भूमिका जितकी मोठी तितका नट, दिग्दर्शक मोठा सांपडत नाहीं. 'विषकन्ये' बाबत नेमकें हेंच घडलें आहे.

प्रश्न — 'मोठी भूमिका' 'मोठ्या सत्वाची भूमिका' असें आपण नगरच्या नाट्य संमेलनांत म्हणालांत. अधिक तपशील सांगाल काय ?

भावे — कांही भूमिका मोठ्या असतात. याचा अर्थ मोठ्या Flight च्या त्या भूमिका असतात. मोठ्या 'सत्वा' ची ती भूमिका असते त्यामुळें साहजिकच मोठ्या Flight च्या नटाची तिची मागणी असते. 'सिंधु' ही मोठी भूमिका आहे! 'हॅम्लेट' ही मोठी भूमिका आहे. मोठ्या सत्वाची भूमिका आहे. म्हणून तेथें lesser order चा नट वा नटी चालत नाहीं. सामान्य Order च्या भूमिकेसाठीं मोठ्या Flight च्या नटांची गरज भासत नाहीं. अशीं नाटकें कुणींही केली तरी चालतात. करतातही. नटांचे ठिकाणीं भूमिकेची Flight नसेल तर नाटक कितीही Flight चे असलें तरी तें पडतें. 'स्वामिनी' तील जगन्नाथकडून फारशा मोठ्या अपेक्षा नाहींत. भूमिकेच्याच नाहींत. पण नीळकंठ, केदार या भूमिकांनाच मुळांत Flight आहे आणि नटाकडून साहजिकच त्या त्या भूमिका Flight ची अपेक्षा, मागणी करतात. त्या त्या भूमिका जर नटांना पेलल्या नाहींत तर नाटकाची वाताहतच होते परिणामांत फरक पडतो. Lady Macbeth Hamlet यांसारख्या भूमिका मोठा अभिनयगुण मागतात.

प्रश्न — याच संदर्भात मग मोठ्या नाटकाची आपली कल्पना सांगाल काय ?

भावे — मोठें नाटक ह्याचा अर्थ मोठ्या सत्वाच्या भूमिका असलेलें नाटक! अशा भूमिका मोठे संवाद मोठे संघर्ष, मोठे प्रसंग, मोठ्या समस्या व मोठ्या अनेक भावना, व मोठा आशय अपापतः निर्माण करतात. उदाहरणें सांगतां येतील. "भाववंधन" मधून धुंडिराज, लतिका काढून टाका म्हणजे उरते काय ? धुंडिराज तसा लहान माणूस आहे. पण त्याचें सत्व मोठें आहे. सिंधु साध्वी होती., पेलली नाहीं अनेकांना. रुक्मिणीही कुणाला यशस्वी करतां आली नाहीं. नटांचे व नट्यांचे Basic सत्व कमी पडत आलें आहे. गंधर्वानंतर त्यामुळेंच कुणीही ह्या भूमिका यशस्वी करूं शकलेला नाहीं. भाऊबंदकी नाटकांतून रामशास्त्री काढून टाकला तर काहींच उरत नाहीं. मोठ्या नाटकांना मोठें सत्व लागतें. आणि तें जाणणारा व साकार करणारा मोठा नट (मोठ्या ताकदीचा) लागतो. लेखकहि अर्थात् मोठा लागतोच.

प्रश्न— अखेर मोठ्या "सत्वाचा" अर्थ Spiritual values पाशीं पोहोंचतो असें तुम्हांला म्हणावयाचें आहे काय ?

भावे —होय. बऱ्याच अंशीं ते तसे आहे. Spiritual values लाच तें आवाहन असतें. Abstract Values जिवंत करणें, मोठ्या Values ला आवाहन करणें हेंहि लेखकाचें काम आहे. सामान्य नाटकांचें आवाहन लहान असते आणि म्हणून फार मोठ्या नटांची मागणी ती करीत नाहींत. 'म्युनिसिपालिटी' हें नाटक रंगत असे. पण त्याचें Stature लहान आहे. म्हणून त्यामुळें मर्यादित कर्तृत्वाचें आवाहन असे. फुलपांखरूं सुंदर पण आपण गरुडाला मोठें म्हणतों. वाघ मोठा. मांजर लहान, कारण त्यांचें त्यांचें अंतर्गत मोठेपण, अंगभूत मोठेपण आपल्याला मान्य करावें लागतें. There is a difference between a good play and a great play आणि Good Play लिहिणें सोपें नसलें तरी शक्य आहे. पण Good play लिहिणें ही गोष्ट तर फारच कठीण आहे.

प्रश्न — मोठ्या सत्वाचें नाटक असलें तरी










Artistic Execution ला महत्व आहे कीं नाहीं ?

भावे – Artistic Execution ला फार महत्व आहे. Values मोठ्या असल्या तरी Artist ही मोठा लागतो. तें शिवधनुष्य आहे. शिवाजी, संभाजी, सुभाषचंद्र हे विषय मोठे असले तरी त्यावर लिहिणारीं माणसेंही मोठ्या ताकदीची, मोठ्या कलागुणांचीं अशी असायला हवींत. विषय मोठा – कलावंत मोठा आणि अभिनेतेही मोठे असें असलें तर फार मोठें कलात्मक सामर्थ्य त्यांतून निर्माण होईल.

प्रश्न — मग सामान्य माणसाच्या सामान्य वाटणाऱ्या विषयावरील नाटक मोठें कधींच होऊं शकणार नाहीं कीं काय ?

भावे — त्या सामान्य माणासाच्या नाटकांत कांहीं तरी uncommon असेल तर त्याचा फार मोठा परिणाम प्रेक्षकांवर व एकूण नाटकावरच होऊं शकेल. सामान्य माणसाच्या सामान्य महत्त्वाकांक्षा, इच्छा सुद्धां पूर्ण होऊं शकत नाहींत हा सुद्धां खरं म्हणजे फार मोठ्या, उत्कट अशा शोकांतिकेचा विषय होऊं शकेल. "दुरितांचें तिमिर" मधला दिगू तसा सामान्य आहे आणि तरी असामान्य आहे. एकच प्यांल्यांतील सिंधू तशी सामान्य आहे. आज तर ती पुष्कळांना Rediculous ही वाटेल. सिंधू सुधाकराचे पाय धरून "कशी या त्यजूं पदाला" वा "सत्य वदे वचनाला" म्हणते हे प्रसंग आज कदाचित टाळ्या घेणार नाहींत. पण कांहीं Valuesचा ज्यांच्यावरच संस्कार झाला आहे त्यांना अखेर दिगू आवडेल आणि सिंधूही त्यांना पाझर फोडील. अखेर मोठें नाटक मोठी भूमिका, मोठें सत्व यांचा Spiritual values शी कुठें तरी संबंध आहे असें मला वाटतें.

प्रश्न — या पार्श्वभूमीवर नवनाट्य, न-नाट्य ह्या प्रकारांबद्दल आपल्याला काय म्हणायचें आहे ?

भावे — नाटक म्हटलें कीं, एक-Regular Pattern आलें. त्याचे कांहीं नियम आहेत. कांहीं गृहित कृत्यें आहेत, आणि त्या Pattern मधूनच कांहींतरी अभिव्यक्त होत असते. अखेर नाटकाला स्वतःचें म्हणून कांहींतरी निर्बंध आहेतच कीं ! संवाद हवेत, कथानक हवें, संघर्ष हवा. जीवनांतला कंटाळाही रंगमंचावर दिसायला हवा आहे म्हणे. पण अखेर वास्तववादालाही मर्यादा आहेत. त्या मर्यादा झुगारणें यशस्वी होणार नाहीं !

प्रश्न — भावे साहेब, आपण आतां आपल्या कथाकादंबऱ्यांकडे वळूं या.

भावे — बोला. विचारा काय विचारायचं तें !

प्रश्न — एखादें कथाबीज स्फुरल्यानंतर आपण प्रत्यक्ष कथा लिहिण्यासाठीं कांहीं काळ जाऊं देतां काय ? तसा तो आवश्यक आहे असें आपलें मत आहे काय ?

भावे — मी असा वेळ जाऊं देतों व देतही नाहीं. कांहीं कथा पुष्कळ वर्षे मनांत घोळत राहतात.

प्रश्न — उदाहरणार्थ ?

भावे — सतरावें वर्ष, दुःख, सांवल्या, वर्षाव, आला क्षण गेला क्षण ह्यांचा उल्लेख करतां येईल.

प्रश्न — कथा लेखनाच्या संदर्भांत Style (शैली) ला कितपत महत्त्व आहे?

भावे — शैलीला कांहीं महत्त्व आहे. शैली हा लेखकाच्याच व्यक्तित्वाचा भाग आहे. Contents & Style ह्या दोन्हीं गोष्टींना महत्त्व आहे. व्यक्तित्वाशिवाय मनुष्य तसें शैलीशिवाय लेखन फिकें पडेल. शैलींत लेखकाचें व्यक्तित्व प्रगट होतें. व्यक्तित्वाचा आरसा म्हणजे शैली.

प्रश्न — आपल्या कथांतून बरेच तंत्रविषयक प्रयोग केलेले आढळून येतात, ते जाणीवपूर्वक केलेत कीं, अजाणतेपणें घडले ?

भावे — तंत्राचे कांहीं प्रयोग मी जाणीवपूर्वक केले आहेत. तर कांहीं आवश्यकतेमुळें उत्पन्न झाले आहेत. उदा. मुक्ति, रूप या कथांचें बाबतींत असें झालें आहे. कथावस्तू जास्तींत जास्त परिणामकारक करणारी रचना म्हणजे तंत्र!

प्रश्न — आपलें समाधान झाल्याशिवाय आपण साहित्य प्रसिद्धीला देत नाहीं असें आपण लिहिलें आहे (लवंग–वेलदोडे), हें पथ्य पाळणें नेहमीं शक्य होतें काय ?

भावे — नेहमीं शक्य होत नाहीं. वृत्तपत्रीय लेखनाबाबत तर तें सहज–शक्य होत नाहीं. परंतु शेंकडा पंच्याण्णव टक्के वेळीं असें कच्चें लेखन प्रकाशनार्थ जाऊं देत नाहीं.

प्रश्न — ज्या कथा 'जमल्या' नाहींत म्हणून पुन्हां लिहिल्या आणि नंतर ज्यांच्या लेखनानें संपूर्ण समाधान झालें अशा कांहीं कथांचीं नांवें सांगाल काय ?

भावे— "पहिला पाऊस" ही संपूर्णपणें पुन्हां लिहिलेली पहिली–एकच गोष्ट.

प्रश्न — कादंबरीबाबत असें पुनर्लेखन आपण केलें आहे काय ?

भावे — 'अकुलीना'चे बाबतींत कांहीं पानांची भर नंतर घातली आहे, पण पुनर्लेखन मात्र केलें नाहीं.

प्रश्न — "रोहिणी" ही कांदबरी लिहितांना ती चार भागांत लिहिली पाहिजे अशी कल्पना होती कीं, लिहितांना वा लिहून झाल्यावर तो विचार मनांत येऊन गेला.

भावे — 'रोहिणी' लिहितांना ती कल्पना नव्हती. लिहून झाल्यावर मात्र वाटलें कीं, हा विषय अधिक लिहिला पाहिजे. हा तर प्रारंभ आहे याची नंतर जाणीव झाली.

प्रश्न — 'अकुलीना'चें पत्रात्मक तंत्र तुम्हीच प्रथम वापरलेलें दिसते. आपल्याला ती कल्पना कशी सुचली ?

अनुक्रमणिका

भावे — 'अकुलीना' ही पहिली पत्रात्मक कादंबरी नव्हे. "इंदू काळे, सरला भोळे" ही वामनराव जोशांची पत्रात्मक कादंबरी—पूर्वीच प्रसिद्ध झालेली आहे.

प्रश्न — पण त्यांत सारीं पत्रें एकानेंच लिहिलेलीं नाहींत.

भावे — हें मात्र खरें आहे. तसा प्रयोग फार तर मी प्रथमच केला असेल. त्या तंत्रांत Liberties घेतां येतात, Personal touch येतो. Analysis करतां येते. Intimacy & Warmth आणतां येते असें वाटलें म्हणून त्याचा वापर करण्याची कल्पना सुचली. एक अतिशय Intimate अनुभव, उत्कट अनुभव सांगायचा होता म्हणून पत्राचें माध्यम आलें आहे. लांबीचाही प्रश्न होताच. पण व्यावहारिक कारणासाठीं मात्र तें तंत्र वापरलें नाहीं.

प्रश्न — कादंबरी लिहितांना आपण कांहीं योजना आंखून वगैरे लिहितां कीं, नाहीं ? कीं प्रारंभ करतां आणि मग तपशील भरला जातो?

भावे — योजना कांहीही नसते. फारच स्थूल रूपरेखा असते. सगळा तपशील लिहितां लिहितां भरला जातो. कुठल्याच कादंबरीचा असा सर्व तपशील ठरविला नाहीं. दिवाळी अंकांतून कादंबऱ्या लिहिल्या. Pressure होतें. त्यामुळें Re-write केलें नाहीं. पुन्हां वाचलेही नाहीं. वह्या लिहित होतो आणि देत होतो. मागील तपशीलही ध्यानीं नसे. फक्त कच्चा आराखडा असे. बाकी सारे लिहितां लिहितां सुचत असे.

प्रश्न — अकुलीना, वर्षाव व अंतराळ ह्या कादंबऱ्याच्या कुळकथा सांगाल काय?

भावे— '**वर्षाव**' ही नव्वद टक्के खरीखुरी कथा आहे. संपूर्णपणें खरी कथा आहे. ती बाई मी पाहिली आहे. 'अकुलीना' ही मात्र अनेक तपशीलांची गोळाबेरीज आहे. अंतराळचा फक्त सांचा खरा आहे. असे एक प्रोफेसर माझे मित्र आहेत. त्यांना मीच लग्नाचे संदर्भात भेटायला गेलो होतो' त्यावेळीं त्यांनी "पहिल्या मृत पत्नीला मी विसरूं शकत नाहीं" असें सांगितलें. त्यानंतर त्यांनीं किती तरी वर्षें लग्न केलें नाहीं. माझ्या वडिलांचे एक मित्र होते देव नांवाचे ! त्यांचीही कथा अशीच होती ! तेव्हां 'अंतराळ' हें Combination आहे. सांचा सर्व खरा आहे. दादरला अशी सौंदर्य प्रसाधनें विकायला मुलगी येत असे हें खरें आहे. त्यांतला 'बॅनर्जी' खरा आहे. त्याची Philosophy खरी आहे. फक्त ती मुलगी 'अकुलीना' नव्हती. ती मी रंगविली आहे. वर्षावमधला नायक खरा आहे. पेठे खरा आहे आणि कुसुमही खरी आहे.

प्रश्न — सांवल्या, वैरी, स्वप्न, सतरावें वर्ष, शोकांतिका, पुतळा, सुगंध, एका झाडाचा मृत्यु या कथांची बीजें कशी सुचली ? कुठून मिळाली ?

भावे — सांवल्या, वैरी, स्वप्न, सतरावें वर्ष ह्या मी पाहिलेल्या वा भोगलेल्या गोष्टी आहेत. "शोकांतिका" ही बालगंधर्वांविषयींची कथा आहे. "पुतळा" मधील सखाराम मोगरे मी पाहिलेला आहे. "सुगंधा"-मधील कल्पना एका Parellel घटनेवरून सुचली आहे. "एका झाडाचा मृत्यु" ही कथा एक एकशें पन्नास वर्षांचें जुनें झाड पडलेलें मी पाहिलें त्या अनुभवावरून लिहिली आहे.

प्रश्न — भावे साहेब, "Best of Bhave" या पुस्तकाचं संपादन जर तुमच्यावरच सोंपविलं तर तुम्ही कोणकोणत्या कथांची निवड कराल ?

भावे — मला हें संपादन करतां येणार नाहीं. त्या कथांची संख्या बारा अशी गृहित धरून तर नाहींच करतां येणार. कारण मला आवडणाऱ्या किमान पन्नास तरी कथा अशा आहेत कीं, ज्यांचा समावेश अशा संग्रहांत करावा लागेल. मला त्यामुळेंच हें काम अवघड वाटतें. Best of Bhave म्हणून जें पुस्तक निघालें आहे त्यांत सीमेवर, व्यथा, पिंपळपान, फुलवा, वैरी अशासारख्या कितीतरी कथा आल्या नाहींत. Best of Bhave म्हणून जर ५० कथा संपादित करायला सांगितलं तरच तें काम मला शक्य होईल.

प्रश्न — साहित्यनिर्मितींत आपल्याला नौ आखली, लडाख वगैरे ठिकाणच्या प्रवासाचा कितपत उपयोग झाला ? असल्या प्रवासांचा उपयोग होतो असें आपणांस वाटतें काय ?

भावे — अतिशय उपयोग झाला आणि उपयोग होतो असें माझें मत आहे. फक्त हा प्रवास उघड्या डोळ्यांनीं केला पाहिजे. लेखक, दिग्दर्शक, तर यांना प्रवास, वाचन अवलोकन प्रत्यक्षानुभव या गोष्टींची आवश्यकता आहे. तेंच त्यांचें भांडवल आहे.

प्रश्न — संपूर्णतया "काल्पनिक" असें कांहीं साहित्य निर्मितींत असते काय?

भावे — संपूर्णतया काल्पनिक असें साहित्यांत कांहीं असत नाहीं. लेखकावर प्रत्यक्षाचेच संस्कार असतात. गोळाबेरीज, वजाबाकी, गुणाकार करूनच लेखक लेखन करतो. सत्याचाच कसला ना कसला आधार त्या नवनिर्मितीला असतो.

प्रश्न — आपल्याला फिरण्याचें वेड आहे. दररोज फिरायला जातां आपण, यांत केवळ फिरण्याचा हेतु असतो कीं, चिंतनाचा जो निवांतपणा लागतो तो त्यांतून मिळतो म्हणून आपण फिरायला जातां ?

भावे — फिरण्याचा शरीर आणि मन यांना Tonic सारखा उपयोग होतो. फिरणें आणि स्नान यांचा मला फार उपयोग होतो. अगदीं अन्नासारखा उपयोग होतो. ह्या दोन्हीं गोष्टींमुळें मनावरचें मळभ जातें. चालतांना विचार करतो. शरीर व मनासाठीं ह्या दोन्हीं गोष्टींची मला फार गरज वाटते.

प्रश्न — आपण ललित लेखकही आहांत आणि झुंजार प्रचारकही आहांत. ह्या दोन भूमिका वठवीत असतांना कधीं संघर्ष येतो, कधीं भूमिकांची न कळत अदलाबदल होते असें आपणांस वाटतें काय ?

अनुक्रमणिका






कलावंत ही भूमिका कायम राखण्याचे दृष्टीनें आपण काय केले ?

भावे — हे कप्पे शक्यतो वेगळें ठेवण्याचा प्रयत्न मी करतों. प्रचार वेगळा ललित लेखन वेगळें. पण देशाच्या वा धर्माच्या जीवनमरणाचा जेव्हां प्रश्न असेल तेव्हां मी ललिताला Secondary Importance दतो – देईन. समाजाचे जगणें महत्त्वाचें मानतों. मी जी Portrayals केलीं आहेत त्यांत Values ची कांहीं माणसें रंगविलीं तर तो कांहीं प्रचार नाहीं. तें समाजचित्रण असते पण कांहीं माणसें फार Touching आहेत. त्यामुळें त्यांना Artistic Portrayals मध्येंही प्रचारच दिसतो. "पुतळा"लाहि प्रचार कथा म्हणणारीं माणसें निघतात.

प्रश्न — लेखनाला कांहीं System असावी काय ? आपलें planned writing बद्दल काय मत आहे ?

भावे — हा प्रश्न Individual स्वरूपाचा आहे. ज्याच्या त्याच्या संवयीचा तो भाग आहे. लिहिणें हें जसें यांत्रिक नाहीं तसेंच तें स्फूर्तीवरही केवळ अवलंबून नाहीं. असें मला वाटतें. लिहायला वसलो कीं लिहून होतें. planned writing मी केलें नाहीं तरी सुद्धां कधीं तरी खूप लिहून टाकलेलें आहे. वैयक्तिक संवयीचाच हा भाग आहे असें मला वाटतें.

प्रश्न — चांगले, जाणकार टीकाकार आपणांस लाभले आहेत काय ? असल्या टीकाकारांचा व त्यांच्या टीकेचा कलावंताला फायदा होतो असें आपणांस वाटते काय ?

भावे — जाणकार टीकाकार मला तरी फार क्वचित लाभले आहेत. पण जाणते वाचक मात्र मला खूप लाभले आहेत. त्यांचाच मला आधार आहे. या बाबतींत आपल्याकडे वैयक्तिक हेवेदावे हाच प्रकार अधिक आढळून येतो. त्यामुळें जाणकार टीकाकार पूर्वग्रहांमुळें लिहित नाहीं. रसिकपणांत नसला तरी प्रामाणिकपणांत तो कमी पडतो. चांगल्या टीकाकारांच्या टीकेचा साहित्याला फार उपयोग होतो. चांगल्या वाचकांच्या टीकेचा सुद्धां उपयोग होतो. एक Literary Climate तयार होतें. आपल्याकडे रसिक व प्रामाणिक टीकाकार फारसे नाहींत हीच खरी उणीव आहे.

प्रश्न — आयुष्यांत 'लिहिलेंच पाहिजे' अशा संकल्पाचे आपले विषय कोणते ?

भावे — शिवाजी, श्रीकृष्ण, रजपूत व मराठ्यांचा इतिहास याविषयीं लिहिलेंच पाहिजे असें वाटतें. श्रीकृष्ण व शिवाजी यांचीं चरित्रें लिहिण्याची इच्छा आहे. पद्मिनीवर लिहावेसें वाटतें. नाटकें, कादंबऱ्या, कथा ह्या विविध प्रकारचें लेखन या विषयावर करावेसें वाटतें.

प्रश्न — आत्मचरित्र लिहिणार काय ?

भावे — अजून ठरविलें नाहीं. कदाचित लिहिनही. लहान माणसाजवळही सांगण्यासारखें कांहीं तरी असते ह्या दृष्टीनें मी लिहिनही. पण ठरविलें नाहीं हें खरें !

प्रश्न — नवकथेंतलें चांगलें वाईट काय ?

भावे — कथा व्यापक केली. सूक्ष्म केली, नवीन घाट दिला. नवीन सांचा दिला–कथेंचें Sphere मोठें केलें. कितीतरी सूक्ष्म, तरल असे अनुभव व्यक्त करणारा नवा घाट दिला. विषय, तंत्राचे सांचे मोडले 'पिंपळपान' सारख्या गोष्टी Moods च्या आहेत. नवकथेंत त्या वसतात. फडके युगांत तें शक्य झालें नसतें. नवकथा At its best असतांना हें घडलें आहे आणि तें चांगलें आहे.

पण पुढें दुर्बोधता, नीरसता, बीभत्सता हेंच परिमाण मानण्यांत येऊं लागलें तेव्हां मात्र मला 'संबंध नको' असें वाटूं लागलें. मी ती Disown केली. नवकथा ही अखेर प्रचंड कथा-वृक्षाची शाखा आहे. तें एक दालन आहे. पण मग तींत दोष शिरले. Flat, Static असें आतां तें प्रकरण झालें आहे. पण त्या दोषांचाच गौरव सुरू झाला. कथेला आदि, मध्य, अंत हवा. ती Interesting असली पाहिजे, Emotional Integrity तींत हवी. Uniformity of impression हवी. कांहीं Target हवें. पण हें गेलें आणि नीरसता वाढली. रस नकोच' ही भूमिका आली. त्याला माझी मान्यता नव्हती. प्रयोगाकडे सहानुभूतीनें पहायला हवें हें खरें ! पण प्रत्येक प्रयोगालाही अखेर कांहीं परीक्षा द्यावी लागतेच. साधुसंतांनाही ती परीक्षा चुकली नाहीं. नवकथेला ही परीक्षा चुकली नाहीं. चुकणार नाहीं.

प्रश्न — भावेसाहेब, आपण लेखनिक (writer) कां ठेवीत नाहीं, तसा कधीं प्रयत्न केला नाहीं काय ?

भावे — मला लेखनिकाला, सांगून लिहून घेणें मान्य नाहीं. हाही संवयीचाच भाग आहे. कांहींना जमते. मला मात्र मी स्वत: सारं कांहीं स्वत: हातानें लिहिल्याशिवाय वरं वाटत नाहीं.

मागें मी आजारी असतांना लेखनिकाला सांगून लिहवून घेतलें आहे पण एकूण वरें वाटत नाहीं हें खरें आहे.

प्रश्न — टेवलखुर्चीची गरज आपल्याला लागत नाहीं ?

भावे — छे ! छे:! मला आपलं कुठेंतरी जमिनीवर वसून लिहिणें फार आवडतं. आंखलेल्या वह्या हव्या. सिगरेटची पाकिटं हवीं. सकाळची वेळ हवी. कीं आपला वेत जमतो. आदेश, सावधानाच्या वेळेला फक्त कधीं मधीं टेवलखुर्ची वापरली. वाकी सारें लेखन याच पद्धतीनें केलें आहे.

प्रश्न — आपल्या पहिल्या कादंबरीचें नांव काय ?

भावे — लौकिक अर्थानें 'अकुलीना' ! पण तें खरें नाहीं. 'समरभूमि' ह्या प्रा. फडके यांच्या कादंबरीच्या Back Cover वर माझी कादंबरी जाहीर झाली होती. पंचवीस वर्षांपूर्वीची ही गोष्ट आहे. पण ती मी लिहिली नाहीं. अजूनही मी ती लिहायला घेतली नाहीं.

प्रश्न — तिचा विषय काय होता ? नांव काय होते ?

भावे — "चकवा" हें त्या कादंबरीचें नांव आणि Idealists च्या Frustrations ची कथा आहे. देशभक्त, प्रियकर, स्कॉलर, व एक सुधारवादी यांच्या frustration ची ती कथा आहे. २५ वर्षे मला त्यांच्या उत्तरार्धाची स्पष्ट रूपें दिसलीं न हींत म्हणून मी अजून ती लिहायला घेतली नाहीं. पण ती कादंबरी लिहिणार आहे. त्याचें टांचण मी बाळगून आहे. पाहूं काय होतें तें ! ●●●









## जुग जुग जियो ! !

**महाराष्ट्राचे** एक लाडके लेखक सुविख्यात कादंबरीकार, कथा-लेखक, रंजक लघुनिबंधकार, शैलीदार वक्ते, यशस्वी प्राध्यापक प्रा. नारायण सीताराम फडके यांना नुकतेंच सत्तरावें वर्ष संपून एक्काहत्तरावें वर्ष लागले आहे. प्रा. फडके यांनीं आपल्या वयाची सत्तरी पूर्ण केली ह्या गोष्टीला तर महत्त्व आहेच आहे. पण जगण्याच्या जिद्दीनें त्यांनीं ती पूर्ण केली. जगण्याचा अभिमान वाटावा, असें कांहींतरी करून दाखविण्याच्या इर्षेनें पूर्ण केली ह्या गोष्टीला अधिक महत्त्व आहे. मध्यंतरीच्या खानेसुमारींत शंभर वर्षे वयांच्या माणसांची वरीच मोठी यादी प्रसिद्ध करण्यांत आली होती. पण त्या यादींत 'नांव' येण्यापलिकडे 'नांव' घेण्यासारखे (वा 'नांवें' ठेवण्यासारखेही) ह्या मंडळींपैकीं कुणीं कांहीं केल्याचें ऐकीवांत नाहीं. महर्षी कर्वेही जगले आणि 'ही' मंडळीही जगली. पण जगण्या-जगण्यांत अंतर असतें. तें अंतर अखेर जीवनविषयक दृष्टिकोनांतून येत असतें.

प्रा. फडके यांच्या जीवनाचा जेव्हां मी विचार करतों तेव्हां मला त्यांच्या 'जीवन-निष्ठे'चा अभिमान वाटतो. मागें एकदां मुंबईच्या एका व्याख्यानांत फडके यांनीं आपला जीवनविषयक दृष्टिकोन मांडला होता. पाश्चात्य विचारवंत, सामान्यजन "Good Morning" पासून दिवसाची सुरुवात करतात. आणि आम्ही मात्र "मी पापी, मला वांचव, माझें रक्षण कर, काशीस जावें – नित्य वदावें – मृत्यू-साठीं" असे विचार मांडत वसतों असा विचार फडक्यांनीं मांडला होता. जीवनाचा आस्वाद, जीवनाचें सौंदर्य उघडया डोळ्यांनीं पाहण्याची भूमिका आपण स्वीकारली पाहिजे असें फडके म्हणतात. फडके यांची ही जीवननिष्ठा फडके यांच्या व्यक्तित्वाचें एक आगळें आकर्षण आहे. प्रा. फडके यांच्या वाङ्मयासंबंधीं कितीही अनुकूल, प्रतिकूल लिहिलें गेलें असलें आणि लिहिले जाणें शक्य असलें तरी एक गोष्ट त्यांच्या शत्रूंनाही मान्य करावी लागलेली आहे ती ही कीं, फडक्यांसारखा साक्षेपीपणा, नियमितपणा, सातत्य, चिकाटी, साहित्य निर्मितीचा सोस फारच थोडयांच्या ठिकाणीं पहायला मिळतो. फडक्यांनीं सतत लिहिलें आहे. कितीतरी 'क्रांतिकारक' लेखक फडक्यांच्या नंतर कितीतरी वर्षांनीं लिहायला लागले आणि फडक्यांची लेखणी चालू आहे हें पहात पहातच 'अंतर्धान' ही पावले. वर्षानुवर्षे लिहूनहि फडके अजून रंजक लिहितात. त्यांनीं प्रौढत्वी "निज शैशव" जपलें आहे. त्यांच्या लेखणीचें तारुण्य हें वाढत्या वयावरोबर ओसरलें नाहीं. त्यांनीं तें ओसरूं दिलें नाहीं. फडक्यांची सत्तरी सरली असली तरी त्यांच्या कादंवरीची 'सत्तरी' 'शंभरी' गांठण्याची जिद्द फडक्यांच्या ठिकाणीं कायम आहे असें दिसते. कलावंत जें निर्माण करतो तें सारेंच "शंभर नंबरी सोनें" असतें असें मानणें मुळांतच चूक आहे. परंतु जें त्यानें निर्मिलें आहे त्यांत टक्केवारीनें प्रत लावायच्या ऐवजीं गुणानुक्रमें प्रत लावणें युक्त होय ! एखादीच कादंवरी लिहून कलाकार 'इतिहास' घडवून जातो, (उदा-रणांगण). फडक्यांच्या प्रवासी, दौलत, अखेरचें वंड, अंजलि, समरभूमि, अटकेपार-सारख्या कादंवऱ्या, किती तरी कथा, गुजगोष्टी, साहित्य टीकात्मक लेखन यांनीं असा "इतिहास" घडविला आहे. मराठींतले ते एक शैलीदार वक्ते आहेत. साहित्य हा त्यांच्या चिंतनाचा, श्रद्धेचा विषय आहे. 'प्रतिभासाधन' वर टीका पुष्कळ झाली. पण अजूनही कॉलेजच्या विद्यार्थ्यांना 'संदर्भग्रंथ' म्हणून तेंच पुस्तक वाचावें लागतें. अभ्यासावें लागते. नंतरच्या काळांत त्या पद्धतीचें पुस्तक अजूनही लिहिलें गेलें नाहीं. फक्त टीकाच होत राहिली. मध्यंतरी एका टीकाकारानें असें म्हटलें कीं, "प्रा. फडके हा एकच लेखक मराठींत असा आहे कीं ज्यानें सतत चाळीस वर्षे 'वाचनीय' मजकूर मराठी वाचकांना दिला आहे." फडके यांच्या ह्या शैलीचें अनेकांनीं अनुकरण केलें आहे. आणि तरीही फडके यांची यशोपताका फडकतच राहिली आहे. आजही वाचनालयांत 'फडके' ह्या नांवाचें अधिराज्य जाणवतें. फडके यांच्या ह्या यशाचें मूल्यमापन केलें जाणें आवश्यक आहे. तसें तें होईलही. (वक्षीसाच्या आशेनें नव्हे तर श्रद्धेनें) आज त्यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा चाहता म्हणून मी येवढेंच म्हणेन "जुग जुग जियो, फडके जी ! !" ●

## तपस्वी दत्तो वामन

**महाराष्ट्राच्या** सामाजिक, राजकीय, वाङ्मयीन व इतिहास संशोधन विषयक जीवनाशीं एकरूप झालेली एक महनीय व्यक्ति म्हणून महाराष्ट्र दत्तो वामन पोतदारांना ओळखतो. मानतो. दत्तो वामन म्हणजे गेल्या अर्धशतकाचा महाराष्ट्राचा चालता वोलता इतिहास आहे. त्यांचा इतिहासाशीं घनिष्ट संबंध आल्यानेंही कदाचित हा नवा इतिहास घडविण्याची प्रेरणा त्यांना मिळाली असावी. कारणें कांहींही असोत, त्यांनीं एखाद्या तपस्व्याप्रमाणें महाराष्ट्राच्या जीवनाच्या विविध अंगांची साधना केली. आणि हें सारें करीत असतांना आपल्या ध्येयापासून ते कधीं विचलित झाले नाहींत. वर्षानुवर्षे, निष्ठापूर्वक, त्यागपूर्वक, जिद्दीची साधना ही गोष्ट अलिकडे दुर्मिळ होत चाललेली आहे. परंतु ज्ञानाच्या, राज-कारणाच्या, साहित्याच्या, वृत्तपत्राच्या इतिहास संशोधनाच्या अशा विविध क्षेत्रांत ज्यांनीं आपल्या जीवनाची 'वाजी' लावून साधना

केली असे तपस्वी गेल्या पिढींत अनेक सांपडतील. ही गोष्ट वाटते इतकी सामान्य नाहीं. दत्तो वामन पोतदार यांनीं एकाग्र चित्तानें ही साधना केली. त्यासाठीं त्यांनीं लग्नही केलें नाहीं. पण आपल्या नैष्ठिक ब्रह्मचर्याची त्यांनीं कधीं जाहिरातही केली नाहीं. किंवा त्यांच्या ब्रह्मचर्याबद्दल 'चर्चा' करण्याची संधीही कधीं त्यांनीं कुणाला मिळू दिली नाहीं. ज्ञानाशीं, ग्रंथांशीं, जुन्या पान्या कागदाशींच जणुं त्यांचें लग्न लागलें होतें. लागले आहे. असेंच त्यांचें जीवन आहे. सततोद्योग, मनाची प्रसन्न वृत्ति, आकर्षक व शैलीदार वक्तृत्व गोष्टी-वेल्हाळपणा, गप्पांचें अतीव वेड व कर्मठ साधनेंतही न लोपलेली रसिकता हीं पोतदारांची खास वैशिष्ट्यें ! परदेशांत जाऊनही त्यांनीं "स्वदेशी" बाणा कायम राखला. देशाची शान गमावणारे असंयमी वर्तन कधीं केलें नाहीं. सत्यालाच सत्य म्हटलें. बाणेदारपणा, निस्पृहपणा दाखविला. महाराष्ट्राच्या लढ्याच्या वेळींही त्यांच्या ह्याच गुणांचें प्रकर्षानें दर्शन घडलें. वुद्धिवादी चिकित्सा हा पोतदारांचा मोठा गुण ! त्यांच्या ह्या गुणांनीच ते आज महाराष्ट्राच्या जीवनाशीं एकरूप झाले आहेत. महाराष्ट्रांतल्या सुवर्णयुगाचे ते एक प्रतिनिधी आहेत. आज ते ७६ व्या वर्षात पदार्पण करीत आहेत. कदाचित कुणाचा विश्वास बसणार नाहीं. पण हें खरें आहे. तपस्वी नेहमींच तरुण असतो. तरुण राहतो. साधक कधीं वृद्ध होत नाहीं. त्याची कला कधीं वृद्ध होत नहीं.

तरुण तपस्वी दत्तोपंत पोतदारांचें आम्ही दीपावलीतर्फे अभिनंदन करतो. त्यांच्या प्रतिभेचा नवा उन्मेष संकलित शिवचरित्राचे रूपानें आम्हांला लवकर पहायला मिळो हीहि एक सदिच्छा !

●●

## मातींतलें माणिक–

**सृष्टीचा** निर्माता ब्रह्मदेव मोठा विचित्र, लहरी व कांहींसा विनोदी प्राणी असला पाहिजे. कधीं कधीं मऊ माती 'वांझ' राहते तर कधीं कधीं माळावर मौक्तिकें सांपडतात. कधीं झाडें बहरतात पण फळ देत नाहींत, तर कधीं लहानशा वेलीला फळें येतात. अनेक प्रकारचे विनोद भोंवती घडतांना दिसतात. 'सत्यवादी' ह्या कोल्हापूरच्या दैनिकाचे संपादक बाळासाहेब पाटील यांच्या जीवनाचा विचार केला कीं याच गोष्टीची साक्ष पटते. खेड्यांत जन्मलेला शेतकऱ्याच्या पोटचा हा मुलगा, नांगर धरावा म्हणून आग्रह होत असतांनाही तो नांगर फेंकून देऊन लेखणी हातीं धरतो. नुसतीच धरतो असें नाहीं तर 'विक्रम कांहीं चला करा तर" ही 'तुतारी'-तली पंक्ति जणुं आपल्यालाच उद्देशून लिहिली आहे अशा जिद्दीनें ती पेलतो. वर्ष दोन वर्षं नव्हे, सतत चाळीस वर्षे पेलतो. कांहीं घडविण्याच्या कांक्षेनें पेलतो ही गोष्ट काय दर्शविते ? परमेश्वरी लीला अगाध आहे हेंच खरं! अक्षरशः नांगर धरून मुलानें शेती करावी अशीच त्यांच्या वडिलांची इच्छा होती. पण परमेश्वराची इच्छा वेगळी होती. आज चाळीस वर्षे बाळासाहेब देसाई 'संपादक' आहेत. शेतकरीच राहिले असते तर कदाचित एखाद्या शेतीस्पर्धेत त्यांना बक्षीस मिळालेंहि असतें. पण त्यांचें कर्तृत्व मोठे होतें. म्हणूनच तें वांया गेलें नाहीं. त्यानें मार्ग काढला आणि शेतकऱ्याचा पत्रकार–यशस्वी पत्रकार झाला.

'दीपावली'च्या वतीनें आम्हीही त्यांच्या ह्या वृत्तपत्रीय दीर्घ सेवेबद्दल त्यांचें अभिनंदन करतो. त्यांच्या व्यक्तित्वाचा जसा विकास होत जाईल, तसतसें त्यांच्या लेखनकर्तृत्वाचेही अनेक 'कस' आमच्या प्रत्ययाला येतील हा विश्वास व्यक्त करतो.

'ब्रेव्हो' बाळासाहेब ! ब्रेव्हो "सत्यवादी"

●●●



## "विश्वाकार" होऊन या

**मराठी** वाचकांचे एक लाडके कथाकार व "शिल्पी" ह्या जाहिरात धंद्यांतील एका अग्रेसर कंपनीचे मॅनेजर, आणि 'दीपावली'च्या कुटुंबातील एक लेखक व सुहृद् **श्री. अच्युत बर्वे** हे जगप्रवासाला निघाले आहेत ही वार्ता 'दीपावली'च्या वाचकांना सादर करतांना आम्हांला अतीव अभिमान वाटत आहे. आनंद वाटत आहे. अच्युत बर्वे हें नांव मराठी वाचकाला एक चांगले कथाकार म्हणून परिचित असलें तरी आजच्या जगांतल्या तितक्याच एका अग्रेसर कलेंतही (जाहिरातीच्या) ते कीर्तिवंत आहेत ही गोष्ट सर्वसामान्य मराठी वाचकाला फारशी ठाऊक असण्याची शक्यता नाहीं. कथाकार बर्वे हीच भूमिका त्याला आवडते. पटतेही ! पण अच्युत बर्वे यांची आपल्या धंद्यावर प्रखर निष्ठा आहे. लेखन हा छंद, हौस म्हणून ते करतात. त्या हौशींतही त्यांनीं केलेली प्रगति निःसंशय कौतुकास्पद म्हणावी लागेल. त्यांच्या ह्या परदेशाच्या दौऱ्यांत ते बेल्जम, इटली, स्विट्झर्लंड, जर्मनी, फ्रान्स, इंग्लंड व अमेरिका या देशांना प्रामुख्यानें भेटी देणार असून परत येतांना ते जपान मार्गे येणार आहेत. सर्व जगाची अशी ही सफर करण्यांतला त्यांचा हेतु मुख्यतः त्यांचा जो धंदा आहे, त्या धंद्याचे दृष्टीनें वर निर्देशिलेल्या देशांत भारताला व भारताच्या मालाला कांहीं जाहिरात दृष्ट्या मार्केट मिळावें हा आहे. ह्या सफरींत अमेरिकेंत भरणारी "जागतिक जत्रा' (world fair) पाहण्याचा आणि **'डेली मिरर'** (Daily Mirror) हा वृत्तपत्राच्या कामकाजाची माहिती करून घेण्याचा त्यांचा इरादा आहे. ह्याशिवाय टेलिव्हिजनवर औद्योगिक जाहिरात कशा पद्धतीनें केली जाऊं शकते ह्याचाही ते प्रत्यक्ष अभ्यास करणार आहेत. श्री. बर्वे यांच्या प्रत्यक्षानुभवाचा ह्या देशाला चांगलाच फायदा होईल हें निर्विवाद ! 'शिल्पी ॲडव्हर्टायझिंग' मध्यें बर्वे १९५१ सालीं आले आणि अवघ्या ९ वर्षांचे आंत ते त्या संस्थेचे मॅनेजर झाले. संस्थेचा पसारा आतां येवढा वाढला आहे कीं, त्यांच्या हाताखालीं वीस कलाकार काम करीत आहेत. जवळ जवळ तीस मोठ्या कंपन्यांची जाहिरात एजन्सी "शिल्पी"कडे आहे. **'लियो लियोनी'** सारखा 'फोर्च्युन' मासिकाचा आर्ट डायरेक्टर हा 'शिल्पी' ला मार्गदर्शन करण्यासाठीं कांहीं काळ लाभला होता. **'टॅनीसन हंट'** हाही एक पाश्चात्य कलाकार कांहीं काळ 'शिल्पी'कडे होता. ह्या परदेश दौऱ्यांत कांहीं साहित्यिकांना आपण भेटणार असालच, असा प्रश्न मी त्यांना केला, तेव्हां त्यांनीं तसा कांहीं बेत नसल्याचें सांगितलें. मुख्यतः धंद्याचे दृष्टीनें जागतिक बाजारांत एक सांखळी उभी करणें हाच त्यांचा हेतु असल्याचें त्यांनीं सांगितलें. आपल्या व्यवसायाची फार मोठीं स्वप्नें बर्वे यांना पडत असावींत हें मला त्यांच्याशीं बोलतांना जाणवलें. एक कर्तबगार, कल्पक कलावंत आज जग-प्रवासाला निघाला आहे. नव्या क्षितिजाचें दर्शन घ्यायला निघाला आहे. येतांना तो अधिक 'समृद्ध' होऊन येईल अशी मला खात्री वाटते. 'दीपावली तर्फे त्यांचे अभिनंदन करतो व शुभास्ते पंथानः अशी सदिच्छा व्यक्त करतों.

**—संपादक**










# चमत्काराला नमस्कार

ह्या बहुरंगी दुनियेंत अधुनमधून चमत्कार घडतच असतात. हे चमत्कार कधीं कधीं सृष्टि घडविते, तर कधीं कधीं त्यांना परमेश्वरी स्पर्श लाभतो. तर कधीं कधीं असले चमत्कार घडविणारीं माणसें उभीं राहतात. असले चमत्कार कधीं कधीं मानवी प्रज्ञा घडविते. तर कधीं कधीं त्याला कलेचा स्पर्श लाभतो. कधीं रंग, तर कधीं सूर, कधीं ताल तर कधीं शब्द अशा





स्वरूपाची किमया करून जातात. कधीं त्या चमत्काराचें नांव असते ज्ञानेश्वर तर कधीं असते जयंत नारळीकर ! कधीं असते अब्दुल करीम खाँ तर कधीं असते कुमार गंधर्व ! कधीं त्याला आपण गणपतराव जोशी म्हणतो तर कधीं त्याचा 'बालगंधर्व' म्हणून गौरव करतो. कधीं त्याला आपण कालीदास म्हणतो तर कधीं त्या चमत्काराचें नांव असते मर्ढेकर ! एक ना अनेक प्रकारचे असले चमत्कार ह्या दुनियेंत प्रत्यही घडत असतात. परवां सहज एक फोटो पाहिला. त्यांत दोन वर्षांचा एक बाल कलाकार पियानो वाजवीत होता. मध्यंतरी रविशंकर यांनीं एक मैफल घडवून आणली. तींत सुप्रसिद्ध तबलजी अल्लारखाँ यांच्या अकरा वर्षांच्या मुलानें साथ केली– तबल्याची ! कलेच्या, क्रीडेच्या साहित्याच्या– किंबहुना जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत असले चमत्कार वारंवार घडत असतात. मानवी श्रद्धा त्यांतून वृद्धिंगत होत असते. प्रज्ञेला नवनवें आवाहन मिळत असते. जीवन हें अधिक सुंदर आहे. जगण्यासारखें आहे असा विश्वास ह्यांतून वाढत असतो. असल्या चमत्कारांतूनच नियंत्या शक्तीबद्दलची श्रद्धा, निष्ठा फुलत, बहरत जात असते.

असाच एक 'रुपेरी' चमत्कार मी गेल्या महिन्यांत पाहिला. कलेच्याच नव्हे, तर कुठल्याही चमत्काराचें दर्शन घेत असतांना कांहीं साधना करावीच लागते. कांहीं मोल द्यावंच लागतं. तसंच मोल त्या 'चमत्कारासाठीं' मोजलं गेलं होतं आणि पाहाणारांनाही मोजावें लागत होतं. पण कुठल्याही 'दिव्यत्वाचं' मोल रुपये पैशांत करतांच येत नाहीं. ताजमहालाचा आनंद हा आगऱ्याच्या रेल्वेभाड्याची खंत उरीं बाळगणारांना कधीं तरी लाभेल काय ? अजिंठा वेरूळ, वृंदावन बाग, गोकाकचा धबधबा, काश्मीरचें सौंदर्य, या व यासारख्या अनेक सौंदर्याचें 'मोल' मनांत न आणतां जर 'मोल' केलें तरच 'दिव्यत्वाची प्रचीति' येईल. मी पाहिलेल्या रुपेरी चमत्कारामागें मी गेलों तो हीच प्रचीति घेण्याच्या भावनेनेंच ! आणि ती भावना तृप्त झाली. मी आनंदित झालों. आनंद नेहमीं वांटून द्यावा म्हणतात ना ! – आज मी तो आनंद वाटून द्यायला निघालों आहे. त्या आनंदाचें नांव आहे **"क्लिओपात्रा !"**

"क्लिओपात्रा" हा एक केवळ चित्रपट नाहीं. तर तो एक मानवी कल्पकता, कला व प्रयत्न यांचा सुरेख संगम घडविणारा चमत्कार आहे. ह्या चमत्कारांतूनच रिचर्ड

बर्टन व एलिझाबेथ टेलर या दोन प्रणयी जीवांना एकत्र आणलें असलें तरी त्या चमत्काराशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं. असले 'चमत्कार' ह्या रुपेरी दुनियेंत (निदान हॉलिवुडच्या तरी) नवीन नाहींत. तेव्हां मला ह्यावद्दल कांहींही म्हणायचें नाहीं. (आपण कांहींही म्हणूं शकतां) तिकडची मासिकें, वृत्तपत्रें यावद्दल इतकं लिहित आहेत कीं, हा विवाह जणुं इजिप्तची राणी क्लिओपात्रा आणि अँटनी यांचाच झाला आहे. 'लिझ् टेलर' ही चांदण्यांच्या जगाची राणी आहे ही गोष्ट मात्र ह्या साऱ्या लेखनावरून ध्यानांत येते. आणि तें राज्ञीपदच तिला चित्रपटाचेंही राज्ञीपद द्यायला कारणीभूत झाले असावें. कारणें कांहीं कां असेनात, ज्या महत्त्वाकांक्षी, रुपवती स्त्रीच्या जीवनाची ही कहाणी आपण पाहतों तशी ती दिसते, भासते.

"**क्लिओपात्रा**" चित्रपटाची कथा जगाच्या इतिहासाच्या अभ्यासकाला तशी नवीन नाहीं. पण मराठी प्रेक्षकाला मात्र ती संपूर्णतया परिचित असेलच असेंही म्हणवत नाहीं. सर्वसामान्यपणें ज्यूलिअस सीझर, मार्क अँटनी, ब्रूटस, क्लिओपात्रा ही नामावलि आपल्या कानांवरून ह्या ना त्या स्वरूपांत येऊन गेली आहे. पण ती सारी कथा हृद्य असल्यानें पुन्हां आपणां साऱ्यांसाठी सांगावीशी वाटते.

रोमच्या स्वामित्वासाठीं ग्रीसमध्यें फार्सेलिया या ठिकाणीं झालेल्या लढाईत ज्यूलिअस सीझर (रेक्स हॅरिसन) पाँपेचा पराभव करतो. लढाईच्या अखेरीस त्याला कळते कीं, पाँपे हा इजिप्तमध्यें पळून गेला आहे. इजिप्तला रोमचा वकील म्हणून जाण्यासाठीं सीझर निघण्याचे तयारींत असतो, तेव्हां त्याच्या मनांत येते कीं, रोम आणि इजिप्त यांच्यांतील अंतर्गत युद्धही आपण संपविलें पाहिजे. ह्या विचारानें तो इजिप्तला जाण्यास निघतो. आपल्या सर्व सत्ता तो मार्क अँटनीस (रिचर्ड बर्टन) बहाल करतो.

अलेक्झांड्रियाला सीझर आल्यावर टॉलेमी हा कांहींसा अर्धवट असलेला राजा सीझरला पटवून देण्याचा प्रयत्न करतो कीं, आपली बहीण क्लिओपात्रा ही मरण पावली आहे. परंतु इतर सर्वांची साक्ष उलटी पडते. परंतु ते खोटेपणानें असें सांगतात कीं, ती टॉलेमीचा खून करण्याचा विचार करीत असल्यानें तिला हद्दपार करण्यांत आलें आहे. सीझरला खूष करण्याचे हेतूनें ते त्याला पाँपेची आंगठी दाखवितात आणि मग त्याचें कापलेलें मुंडकेंहि दाखवितात.

त्याच रात्रीं ब्लँकेट विक्रेता म्हणून अपोलोडोरस म्हणून क्लिओपात्राचा विश्वासू माणूस सीझरच्या चेंबरमध्यें येतो. त्याच्या ब्लँकेटांत असते क्लिओपात्रा ! त्या दोघांची भेट होते. सीझर आणि क्लिओपात्राचें संभापणांत दोघेंही एकमेकांचें कर्तृत्व व बुद्धिमत्ता यांजविषयीं योग्य तो आदर बाळगून बोलतात. सीझरच्या सैनिकांच्या पहाऱ्यांत क्लिओपात्रा तिच्या महालांत जाते. सीझरचे साथी त्याला सांगतात कीं खून, कट कारस्थानें करणारी ही स्त्री आहे. त्यासाठीं आपलं स्त्रीत्व व सौंदर्यसुद्धां प्रसंगीं ती पणाला लावील. परंतु सीझरची योजना निश्चित होती आणि त्यानुसार त्याच्या सैनिकांनीं इजिप्तचें आरमार पेटवून दिले. ती आग भडकली. आपलें मौलिक वाचनालयही जळून खाक झाल्याचें ध्यानीं येतांच क्लिओपात्रा भडकते आणि सीझरच्या महालांत जाऊन त्याला वाक्ताडन करते. आपल्या योजनांमध्यें वारंवार येत असलेल्या अडथळ्यानें सीझर संतापलेला असतो. "मी फार मोठी राणी आहे. लोक मला तसें मानतात" असें क्लिओपात्रा त्याला वारंवार सांगते. तेव्हां तो तिला बजावतो कीं, सीझरला जें वाटते तशीच ती आहे. शारीरिक दृष्ट्या सुद्धां तिचें स्वामित्व तो करूं शकतो—मनांत आणलें तर ! तेवढ्यांत इजिप्तच्या सैनिकांनीं शहरावर स्वारी केली असल्याचें कळते. पण सीझर शांत राहतो. मित्रराष्ट्राच्या सहाय्यानें तो इजिप्तचा पराभव करतो.

टॉलेमी व त्याचे साथी क्लिओपात्राला विषप्रयोग करण्याचा प्रयत्न करतात. परंतु तो प्रयत्न फसतो. त्यानंतर रोमचा वकील व सर्वाधिकारी म्हणून सीझर 'पॉथिनॉस' ला मृत्यूची सजा देतो (युद्धखोरी व क्लिओपात्राचा खून करण्याचा प्रयत्न केला म्हणून) व टॉलेमी व थिऑडोरस यांना अधिकारावरून काढून टाकतो. हें सर्व दृश्य पहात बसलेल्या क्लिओपात्राच्या ध्यानांत येतें कीं, सीझरनें तिला इजिप्तची राणी बनविलें आहे. त्याच्या सामर्थ्याविषयीं तिला आदर वाटतो. आणि आपल्या सर्व महत्त्वाकांक्षा पूर्ण करण्याच्या दृष्टीनें ह्या सामर्थ्याची आपल्याला गरज आहे याची जाणीव तिला होते.

सीझरला अधुनमधून फिट्स येत असतात. तो आपली ही शारीरिक दुर्बलता क्लिओपात्रापासून लपवून ठेवण्याचा प्रयत्न करतो. त्यांतून तिच्या ध्यानीं येते कीं, ह्या सर्वसमर्थ माणसाला आपण मदत दिली पाहिजे. प्रेम दिलें पाहिजे. या भावनेंतून ते जवळ येतात.

रोमचा प्रतिनिधि म्हणून सीझर क्लिओपात्रेला इजिप्तचें राणीपद बहाल करतो. त्यावेळीं पद्धतीनुसार तो सिंहासनापुढें वांकतो. याचा त्याच्या साथीदारांना संताप येतो.

सीझर जेव्हां रोमला जायला निघतो तेव्हां क्लिओपात्रा त्याला 'आलेक्झांडर'च्या पुतळ्यापाशीं नेते आणि आपल्या सर्व महत्त्वाकांक्षा मोकळेपणानें स्पष्ट करते. जगज्जेता "सीझर" आणि एक तरुण महत्त्वाकांक्षी 'स्त्री' ह्या दोन भूमिकांत संघर्ष उभा रहातो. त्यावेळीं क्लिओपात्रा आणखी एक गौप्यस्फोट करते — सीझरपासून तिला मुलगा होणार असतो ! सीझरला पुत्र नसल्यानें त्याला ह्या बातमीनें अतिशय आनंद होतो. ही वार्ता सीझरच्या पत्नीला कळते, तेव्हा अँटनी तिचें सांत्वन करतो आणि म्हणतो कीं, "रोमन कायद्यानुसार तें लग्न बेकायदेशीर आहे."

सीझरला मुलगा होतो. साक्षीदारांसमोर जर तें मूल उचलून घेतलें तर त्या मुलाला रोमच्या नागरिकत्वाचा अधिकार प्राप्त होतो व वारसपद त्याला मिळते असा रोमचा कायदा असतो. क्लिओपात्रा सीझरकडून तें करवून घेण्यांत यशस्वी होते



अनुक्रमणिका

सीझरच्या ह्या कृत्यामुळें रोमन सीनेटच्या समासदांना अशी भीति वाटते कीं, सीझर स्वतःला रोमचा राजा म्हणून अभिषेक करून घेईल व मग आपल्या ह्या नव्या पुत्राला वारस नेमील.

त्यामुळें सीझरचे मित्रच मुळीं कटवाले होतात. त्याच सुमारास सीझर क्लिओपात्रा व नवजात पुत्राला मागें ठेवून रोमला परत येतो. रोममध्यें त्याची तहहयात सर्वाधिकारी म्हणून नेमणूक केली जाते. क्लिओपात्रेला मात्र मुलाला घेऊन रोमला परत येण्याची घाई होते. क्लिओपात्रेला आपला मुलगा राजा झालेला पाहण्याची उत्कंठा असते. क्लिओपात्रा रोममध्यें येते. सीझर तिचें अभिमानानें स्वागत करतो. जनता आनंदानें भारावून जाते. पण सीनेटचे सभासद व त्यांच्या कुटुंबियांकडून मात्र द्वेषपूर्वक स्वागत केलें जातें.

त्यानंतर सीझर रोमचा राजा होण्याची इच्छा सहकाऱ्यांजवळ व्यक्त करतो. ब्रूटसची खात्री पटते, कीं सीझरला 'राजा' व्हायचें आहे. त्याचा अपेक्षाभंग होतो व तो कटवाल्यांना संमति देतो. शेवटीं सीनेटच्या बैठकीचे वेळीं सीझरचा खून करण्यांत येतो.

दोन वर्ष झगडा दिल्यानंतर अँटनी सीझरच्या खुन्यांचा पराभव करतो व रोमचा सेनापति बनतो.

सेना घेऊन अँण्टनी पूर्वेस तळ देऊन बसला असतांना त्याला श्रीमंती भेटी आणि श्रीमंती चैनचान यामुळें पैसा अपुरा पडतो. क्लिओपात्रेकडे अहंकारामुळें तो जात नाहीं. परंतु क्लिओपात्रा त्याच्या प्रतिनिधीला भेट नाकारते. इजिप्तच्या भूमीवर आणि अँण्टनीलाच फक्त आपण भेटूं शकूं असें ती कळविते. अहंकाराच्या ह्या लढ्यांत क्लिओपात्राचा विजय होतो. अँण्टनी तिला भेटायला येतो. सीझरच्या आठवणी काढून ती त्याला मुद्दाम चिडविते. खूप दारू पाजते. त्याच रात्रीं संतापाच्या भरांत दारू प्यालेला आणि एक प्रकारचें अपेक्षाभंगाचें दुःख सोशीतच अँण्टनी क्लिओपात्राच्या महालांत जातो. आणि आपली उत्कट प्रीति व्यक्त करतो. आणि सीझरविषयींची दडपलेली भीति, तिरस्कार व द्वेष यांचीही स्पष्ट कबुली देतो. अँण्टनीच्या ह्या भावना क्लिओपात्राचेही मनांत असल्यानें ती दोघें प्रियकर होतात.

रोममध्यें ह्याची चर्चा होते. अँण्टनीचें स्थान कायम रहावें म्हणून त्याला निरोप येतांच तो रोममध्यें जातो. 'ऑक्टेव्हियस'ला तो रोममध्यें राहणें नको असते. शेवटीं त्याच्या बहिणीबरोबर अँण्टनीचें लग्न लावण्याचें कारस्थान तो रचतो आणि तें यशस्वी होतें.

ही वार्ता कळतांच क्लिओपात्रा अतिशय अस्वस्थ होते. धाय मोकलून रडते. अँण्टनीचें लग्न हाही एक जुगार ठरतो. कारण त्याचें मन क्लिओपात्रानें व्यापून टाकलें असतें.

रोमला गहूं आणि सुवर्ण हवें असते. पण इजिप्तची राणी साऱ्या रोमन वकिलांना परत पाठविते–हात हलवीत ! अँण्टनी तिला भेटतो. ती अर्ध्या रोमन साम्राज्याची मागणी करते. दोघांच्याहि तें हिताचें आहे असा दावा ती करते. रोममधून ऑक्टेव्हियन अँण्टनीच्या नाड्या आंखडतो. इकडे–क्लिओपात्रा ! तो इजिप्तच्या पद्धतीनुसार तिच्याशीं लग्न करतो आणि सीझरच्या मुलाला इजिप्तचा राजा म्हणून जाहीर करतो. रोमन जनतेला युद्धप्रवृत्त करण्याचें कारस्थान ऑक्टेव्हियन करतो. "अलेक्झांड्रियांत आपल्याला पुरण्यांत यावें" अशी अँण्टनीची मृत्युपत्रांतील इच्छा वाचून सिनेटर्स संतापतात व क्लिओपात्रे विरुद्ध युद्ध सुरू होते. अँण्टनी चांगला सेनापति असूनही क्लिओपात्राच्या चुकीच्या मार्गदर्शनामुळें त्याच्या सैनिकांचा पराभव होतो. त्याच्या साऱ्या नौका भस्मसात् होतात. अँण्टनी मेला असें समजून क्लिओपात्रा आपलें तारूं परत फिरवते. तें पाहून अँण्टनी सैनिकांना तसेंच सोडून तिचा माग काढीत निघतो. सेनापति, सैनिक म्हणून सारीं कर्तव्यें तो विसरतो. त्यानंतर त्याच्याच वागण्याचा त्याला पश्चाताप होतो. आणि मग कांहीं काळ तो मृतवत् जीवन जगतो. क्लिओपात्राशीं तो बोलतहि नाहीं. ऑक्टेव्हियन तिला शांतीची अट घालतो— अँण्टनीचें मुंडकें हवें ही ! ती नकार देते. अँण्टनीच्या ह्या दशेला आपण कारण झालो हें ध्यानीं येऊन ती त्याची क्षमा मागते. तिच्या प्रेमापायीं आपली अवस्था किती शोचनीय झाली यांची वेदना तो व्यक्त करतो. दोघांची आत्यंतिक ओढ उरते. लौकिक जयपराजय, राज्यें साम्राज्यें यांचा विचार गळून पडतो. क्लिओपात्राच्या राजवाड्यांत येतो तेव्हां अपोलोडोरस त्याला खोटेंच सांगतो कीं, राणी दिवंगत झाली. अँण्टनी पोटांत तलवार खुपसून घेतो. तेव्हां मग त्याला तो राणीकडे घेऊन जातो. अँण्टनी तिच्या मांडीवर प्राण सोडतो. ऑक्टेव्हियन राजवाड्यापाशीं येतो. तिनेंच राज्यपद सांभाळावें अशी आपली इच्छा असल्याचें तो सांगतो. पण राणीचा त्यावर विश्वास बसत नाहीं. मुलगा व प्रिय पति गेल्यावर जगण्यासारखें ह्या जगांत आहे री काय ? ह्या विचारानें क्लिओपात्रा आत्महत्या करून घेते. ऑक्टेव्हियनला पाठविलेल्या चिठ्ठींत ती लिहिते, "अँण्टनीच्या थडग्याशेजारींच मला पुरा."

—निदान मृत्यूच्या दरबारांत तरी मीलन होईल !

साडेतीन तासांच्या ह्या चित्रपटांत भव्यता, मोहकता, रंजकता, बोध, नेत्रसुखद छायाचित्रण इत्यादि गुणांचा समन्वय आहे. **"सजीवता"** हा सर्वांत मोठा गुण ! मानवी मनांतल्या सूक्ष्म भावनांचे हृद्य आलेख यांत आहेत. राणीचें रोममधील आगमन हा एक "स्टार पॉइंट" ! नौकायुद्ध, सीझरचा खून ! अँण्टनीच्या लग्नानंतरच्या राणीचा आक्रोश, अँण्टनीचें पिचलेलें मन ह्यांचें चित्रण मनोज्ञ आहे. रिचर्ड बर्टन (मार्क अँटनी) लिझ् टेलर (क्लिओपात्रा) व रेक्स हॅरिसन (सीझर) रॉडी मॅक् डोवॉल (ऑक्टेव्हियन) यांच्या कामांचा खास उल्लेख करायला हवा. जोसेफ एफ्. मॅक्नीवीझ् यांनीं या चित्रपटाचें दिग्दर्शन केलें असून "टॉड ॲओ" (Todd-Ao) पद्धतीनें विशाल पडद्यावरील हा चित्रपट पहातांना कितीतरी सौंदर्य स्थळें ध्यानीं येतात. दोन समर्थ जीवांची ही शोकांतिका मनाला विषण्ण करते. मग चित्रपट केवळ ऐतिहासिक रहात नाहीं. इजिप्त आणि रोम यांची मर्यादा मळून पडते. आणि उरतो फक्त एक रम्य व हृदय हलवून सोडणारा भावनाविष्कार ! हा "ट्वेंटिएथ सेंचरी फॉक्स"चा 'रायटप' नाहीं ! पण चांगल्याला चांगलं म्हणायलाच हवं, नाहीं काय ?

# 'हाऊ दी वेस्ट वॉज वन्!'



प्रस्तुत चित्रपटांतील
एक हृदयंगम
प्रसंग

**मुंबईला** सध्यां मेट्रो चित्रपटगृहामध्यें मोठ्या धूमधडाक्यानें चालूं असलेल्या 'हाऊ दी वेस्ट वॉज वन्!' या स्फूर्तिशाली ऐतिहासिक बोलपटानें चित्रपटसृष्टींत विषयाच्या दृष्टीनें एक नवा विक्रम प्रस्थापित केला आहे!

अमेरिकेच्या इतिहासांतील सलग असा पन्नास वर्षांचा कालखंड एकाच चित्रांत सादर करण्याचें ध्येय समोर ठेऊन हा चित्रपट निर्माण केल्याबद्दल हॉलिवूडच्या 'मेट्रो गोल्डविन मेयर' या मान्यवर चित्र-संस्थेवर चोहोंकडून अभिनन्दनाचा वर्षाव होत आहे. एकाच प्रदीर्घ अशा कालखंडावर आधारलेला चित्रपट निर्माण करण्याची मनीषा धरून अनेक चित्रपट संस्थांनीं वेळोवेळीं कथानकें निवडलीं, अनेक योजना आंखल्या; परंतु त्या योजनांचे कागदी घोडे नाचविण्यापलीकडे कुणाची मजल जाऊं शकली नाहीं. मेट्रो गोल्डविन मेयरनें ह्या धाडसी प्रयोगास प्रत्यक्ष हात घातला, इतकेंच नव्हे तर अमेरिकेच्या इतिहासांतील अर्धशतकाचा सलग असा धांवता आढावा या एकाच चित्रांत अगदीं वास्तव, खऱ्याखुऱ्या, परंतु रंगतदार पद्धतीनें घेण्यांत अपार यश मिळविलें, ही गोष्ट आतां सिद्ध झाली आहे!

आज आपणांस अमेरिका खंड हें एक महान बलशाली राष्ट्र म्हणून सुपरिचित आहे. परंतु गेल्या शतकाच्या पूर्वार्धांत त्या राष्ट्राचे पूर्व आणि पश्चिम हे प्रदेश अलग अलग होते. ह्या दोन प्रांतांमध्यें एक राष्ट्रीयत्वाची जाणीव निर्माण व्हावी म्हणून ज्या अनेक व्क्तींनीं परिश्रमांची पराकाष्ठा करीत आपलें जीवन खर्ची घातलें, अशा तीन पिढ्यांच्या इतिहासाचें रोमांचकारी, ओजस्वी आणि सर्वस्पर्शी दर्शन आपणांस या चित्रांतून घडविण्यांत येत आहे!

१८३९ ते १८८९ ह्या पन्नास वर्षांचा कालखंड समोर ठेऊन, त्या काळांत, पूर्व अमेरिकेंतील ज्या धाडशी व्यक्ति आपलें कुटुंब, बायकापोरांना बरोबर घेऊन, नशीब काढण्यासाठीं म्हणून वसाहती स्थापण्यासाठीं पश्चिम दिशेस जातात, त्यांचें खडतर जीवन हा कथाविषयांचा आत्मा आहे. फिरते व्यापारी, दुकानदार, रेल्वे मजूर, खाणी कामगार, कल्पक परंतु जिद्दी स्वभावाचे सेनाधिकारी, पोलिस अधिकारी आणि रेल्वे इंजिनिअर या मोहिमेंत पुढें क्रमाक्रमानें सामील होतांना दिसतात. ठराविक चाकोरी सोडून जगामध्यें कांहींतरी नवीन कार्य करीत असणाऱ्या व्यक्तींना नेहमीं सामान्य, परिचित स्वरूपाचीं संकटें न येतां, त्यांना कांहीं वेगळीं, विलक्षण, अगम्य अशा आपत्तींना तोंड द्यावें लागतें असा दाखला आहेच! दुर्दम्य अशा आशा-आकांक्षांनीं प्रेरित झालेले हे कर्मवीर समोर येणाऱ्या संकटांशीं प्रभावी झूंज देतात. नद्या, नाले, पर्वत, खोल दऱ्या, नदीच्या अवखळ पात्रामधील भीषण स्वरूपाचे धबधबे ह्यांना न जुमानतां हे लोक शेवटीं पश्चिमेस जाऊन विजयी होतात. रानटी टोळ्यांशीं सलोख्याचे संबंध जुळवितात. जरुरी पडेल तिथें सीमारक्षणासाठीं युद्धेंहि करतात. त्या भूप्रदेशावरील प्रचंड अशीं माळरानें गुरांच्या जोपासनेला फार उपयुक्त ठरतील म्हणून अगोदर तेथील हजारों जंगली श्वापदांचा संहार करतात. हळु हळू,





अनुक्रमणिका

ठिकठिकाणीं, लहानमोठीं गांवें स्थापन होतांना दिसतात, नागरिकांना लुटणाऱ्या खुनी दरोडेखोरांच्या टोळ्यांशीं मुकाबला करून त्या गुंडांच्या नायकांचा नायनाट करतात. व्यापारांत समृद्धि हवी असेल तर पूर्व आणि पश्चिमी प्रदेश रेल्वे मार्गानें जोडावयास हवेत या इर्षेनें अनेक संकटांना तोंड देऊन शेवटीं ती योजना पूर्ण करतात !

ज्या नद्यांच्या अवखळ प्रवाहांनीं सुरवातीस त्यांच्यावर संकटांची परंपरा कोसळली होती त्याच प्रवाहांना ठिकठिकाणीं लहानमोठे बांध घालून—धरणें तयार करून—शेतीसाठीं मुबलक पाण्याचा पुरवठा उपलब्ध करून घेतात. इतकेंच नव्हे तर त्या नैसर्गिक संपत्तीस राबवून वीज तयार करण्याचीं मोठीं पॉवर-स्टेशन्स उभीं करतात ! मबलक खनीज संपत्ति हस्तगत करण्यासाठीं मोठ्या कारखान्यांची स्थापना होत रहाते, शांतता सुव्यवस्था आणि समृद्धि यांची नीट जोपासना झाल्यामुळेंच 'आजची समर्थ अमेरिका' जगामध्यें एक महान असें राष्ट्र म्हणून मोठ्या दिमाखानें मिरवीत आहे !

त्या आजच्या वैभवाचें—शहराचें, शेतीचें, कारखान्यांचें, धरणांचें, ऊंच ऊंच अशा भव्य इमारतींचें आणि प्रगत अशा दळणवळणाच्या मार्गाचें मनोहर दर्शन शेवटीं आपणांस पडद्यावर प्रत्यक्ष होत असतांना, ज्या संस्थापकांनीं सुरवातीस प्राणपणानें लढा दिला आणि पश्चिम बाजू जिंकली त्या महाभागांचें पुण्यस्मरण होतें! त्यांच्या दीर्घोद्योगाचें महत्त्व आपल्या लक्षांत येतें आणि त्या बलशाली अशा राष्ट्राच्या जडणघडणाच्या इतिहासांत, त्यांचे परिश्रम म्हणजे पुढील वैभवाचा 'पाया' होय अशी खात्री पटते.

हा चित्रपट बहुरंगी असून तो 'सिनेरमा पद्धतीनें चितारला असल्यानें निसर्गसौंदर्य मनावर खोल परिणाम करूं शकतें. हॉलीवूडच्या तीन प्रथितयश दिग्दर्शकांनीं हा चित्रपट हाताळला आहे. सुप्रसिद्ध दिग्दर्शक जॉन फोर्ड ह्यांनीं युद्धविषयक प्रसंग प्रभावीपणानें घेतले आहेत. हेन्री हॅथवे ह्या दिग्दर्शकानें नद्यांच्या अवखळ पात्रांचे आणि गुंडांच्या उपद्रवाचे प्रसंग दिग्दर्शित केले असून, दिग्दर्शक जॉर्ज मार्शल ह्यांनीं नव्या रेल्वेची आंखणी आणि जंगली श्वापदांची झुंज यासंबंधींचे कथाप्रसंग परिणामकारक पद्धतीनें घेतले आहेत. संगीत दिग्दर्शनाची बाजू आल्फ्रेड न्यूमन ह्यांनीं सांभाळली आहे. या चित्रपटांत मोठमोठ्या चोवीस चित्रतारे आणि चित्रतारकांनीं भूमिका केल्या असून विशेषतः जेम्स स्टुअर्ट, हेन्री फोन्डा, कार्ल माल्डन, ग्रेगरी पेक, डेबी रेनॉल्डस, कॅरोल बेकर ह्यांच्या भूमिका सुन्दर वठल्या गेल्या आहेत. अभिनेता स्पेन्सर ट्रेसी आपल्या स्निग्ध परंतु धीरगंभीर आवाजानें चित्रपटाचें निवेदन प्रेक्षकांस सांगतो, त्यामुळें चित्रपटाच्या रंगतींत निःसंशय भर पडली आहे. हा चित्रपट अमेरिकेच्या इतिहासावर आधारित असल्यानें तो अमेरिकेंत गाजला हें योग्यच! परंतु जगांत तो सर्वत्र गाजला—गाजत आहे, याचें कारण शोधूं गेल्यास, त्या चित्रपटामधील 'इमानी धडपड्या' 'जिद्दी प्रवृत्तीचा अमेरिकन माणूस' प्रेक्षकांच्या अन्तःकरणाचा ठाव घेतो हें आहे. या चित्रपटास अकादमीनें तीन 'ऑस्कर पारितोषिकें' बहाल केलीं आहेत!

ह्या चित्रपटासंबंधीं ह्या साऱ्या गौरवपूर्ण अशा घटना नमूद करीत असतांना, मला, आपल्या मराठी चित्रपट सृष्टीमधील परवांच्या एका ऐतिहासिक चित्रपटाची आठवण येत आहे. ती आठवण मोठी खेदजनक आहे. धर्मवीर छत्रपति संभाजी महाराजांना, त्या चित्रपटांमध्यें, धुणें वाळत घालण्यास लावून मराठी प्रेक्षकांना शरमेनें मान खालीं घालण्याचा विक्रम एका चतुर दिग्दर्शकानें साधला होता!

मेट्रो गोल्डविन मेयर कंपनीनें आपल्या राष्ट्राची इभ्रत, आपल्या राष्ट्राचा लौकिक वाढावा अशा ध्येयानें प्रेरित होऊन अखिल जगास सादर केलेला 'हाऊ दी वेस्ट वॉज वन्!' हा ऐतिहासिक रंगीत चित्रपट, कथावस्तूचा दर्जा मोठ्या जबाबदारीनें सांभाळून आहे, म्हणून तो इतका यशदायी झाला आहे!

—आदित्य



**पुढील अंकाचें एक**
**खास आकर्षण**
**'क्लार्क गेबल'**

# मराठींतील 'एक आगळें पुस्तक

**कथा** कादंबरी, नाटक, लघुनिबंध संग्रह, काव्यसंग्रह, प्रबंध इत्यादि वाङमयाचे प्रकार आपल्या साऱ्यांच्याच परिचयाचे आहेत. वाचनालयांत आपण जातों आणि यापैकीं कांहींतरी साहित्य द्या अशी मागणी करतों. परंतु कांहीं पुस्तकें संपूर्णपणें "स्वतंत्र" असतात त्यांना सांचात बसवितां येत नाहीं. तीं स्वयंभू असतात. त्यांचें वेगळेपण हेंच मुळीं त्यांचें प्रथम वैशिष्टय ठरत असतें.

चित्रकार दलाल यांनीं प्रसिद्ध केलेल्या ह्या पुस्तकाची जात अशीच वेगळी आहे. ह्या पुस्तकांत दलाल आहेत म्हणजे चित्रेंही आहेत. पण हें नुसत्या चित्रांचें पुस्तक नाहीं. ह्या पुस्तकांत गद्य भागही आहे. तो श्री. आनंद साधले यांचा आहे. तो गद्य भाग हाही योजनापूर्वक आलेला आहे. कांहीं संकल्प मनांत योजूनच मुळीं हें पुस्तक जन्म पावलें आहे. मग यांत आहे तरी काय ? यांत चित्रें आहेत. रंगीत चित्रें आहेत. तीं चित्रेंही कांहीं योजनेंतून आलीं आहेत. संस्कृत साहित्यांत ज्यांचें नांव अजरामर झालें आहे अशा कवींचीं ही रंगीत चित्रें आहेत. त्यांत कालिदास आहे, भास आहे. शूद्रक आहे आणि पंडितराज जगन्नाथ आहे. जयदेव, माघ, श्रीहर्षही आहेत. तीं सारीं (अकरा) चित्रें अतिशय आकर्षक आहेत. बोलकीं आहेत. त्या त्या कवीच्या व्यक्तित्वाचा ठसा मनावर उमटविणारीं आहेत. पण तीं नुसतीं चित्रें जरी पुष्कळसं बोलून जात असली तरी सारी जीवनकथा चित्राच्या चौकटींत बसविणें सर्वस्वी अशक्यच ! आणि म्हणूनच शैलींतल्या निवेदनाची गरज होती. श्रीयुत आनंद साधले हे संस्कृतज्ञ आहेत. पंडित आहेत. पण ह्या निवेदनाला पांडित्याबरोबरच रसिकतेची आणि लालित्याची गरज होती. साधले यांनीं प्रत्येक कविश्रेष्ठीची ओळख करून देतांना जें निवेदन लिहिलें आहे त्यांत त्यांच्या ह्या दोन्ही गुणांचा प्रत्यय येतो. पृष्ठ मर्यादेंत त्यांना हा प्रत्यय द्यायचा होता. त्यामुळें त्या त्या कवीच्या नेमक्या गुणवैशिष्टयांवरच भर देणें भाग होतें. साधल्यांनीं प्रत्येक निवेदनाला दिलेलें समर्पक शीर्षक हें त्यांच्या मार्मिकतेचें निदर्शक आहे. त्याचें सूत्र त्यांनीं कायम राखले आहे. कालिदास (कविता कामिनीचा विलास) भारवी (कविता कामिनीचें तेज) भवभूति (कविता कामिनीची करुणा) बाण (कविता कामिनीचें स्वप्न) भट्ट नारायण (कविता कामिनीचे रणकाज) जयदेव (कविता कामिनीची माधुरी) जगन्नाथ पंडित (कविता कामिनीचा आत्मविश्वास) ह्यासारख्या शीर्षकांतून त्या त्या कवीची जणुं व्यक्तिरेखा समोर उभी राहते आणि डोळे उघडून जर दलालांचीं चित्रें आपण पाहिलीं कीं, मनांतल्या चित्रांशीं तीं संपूर्णपणें मिळती जुळती असल्याचें ध्यानीं येते व एका वेगळयाच आनंदाचें उधाण येतें. साधल्यांचे शब्द आणि दलालांचा कुंचला यांचा मनोज्ञ संगम म्हणजे "अमृत मेघ". फार मर्यादित जागेंत ह्या दोघांनींही एक असामान्य, अमर्याद असा कलाविष्कार केलेला आहे. कवींचीं चरित्रें उपलब्ध नाहींत. कांहीं लहानसे धागे फक्त हातीं मिळतात.




• अमृत मेघ • नेत्रपल्लवी • पश्चिम कडा

पण त्यांतूनही कांहीं तरी चांगलें शोधणें हेंच मुळी साधल्यांचें काम होतें व त्यांनीं ते 'साधले' ही ! हीं सारी चरित्रें वाचीत असतांना संस्कृत साहित्याच्या रसवत्तेची साक्ष पटते ! मुळांतून त्या त्या कलाकृति वाचण्याची प्रेरणा यांतून मिळावी ही साधल्यांची इच्छा रास्त आहे. आणि ह्या पुस्तकाच्या वाचकाला तो संकल्प करण्याची प्रेरणा खात्रीनेंच मिळेल.

श्री. दलाल तर सिद्धहस्त चित्रकार आहेत. त्यांच्या साऱ्या कलाकृति तो तो भाव प्रगट करून जातात. 'सजीव' चित्रें आहेत तीं ! आणि 'सजीव' असल्यामुळें तीं आवाहन करतात, आकर्षित करून घेतात ! मधील रेखाचित्रें वैशिष्टयपूर्ण आहेत. सांचांत न बसणाऱ्या पण तरीही स्वतःच्या वैशिष्टयांमुळें मनावर ठसणाऱ्या ह्या पुस्तकाचें नांव आहे "अमृत मेघ" !

(**अमृत मेघ — प्रकाशन** दीनानाथ दलाल. दलाल आर्ट स्टुडियो ४२ केनेडी ब्रिज. मुंबई ४. **मूल्य** ६ रुपये. )

# सधन व्यक्तिमत्वाचीं माणसें

**गेलं** दीड तप मराठी कथा जोमानं चालली. इतकीं जोमानं कीं ती आतांशी वाटे लगतच्या झाडाखालीं दमून विश्रांतीसाठीं बसलेली जाणवते. उठून तिला पुढं चालण्याची लहर कधीं येईल याचं भविष्य वर्तविण्यांत हंशील नाहीं. पण झालेल्या वाटचालींत तीन प्रमुख वळणं दिसतात. ती म्हणजे पात्रप्रधान, प्रसंगप्रधान व मानसप्रधान. पैकीं वाटचालींचं व्यवच्छेदक वळण तिसरंच.

याच कालावधींत श्री. उमाकांत ठोमऱ्यांनी स्वतःची कथा लिहिली. येवढया धामधुमींत ही त्यांची स्वतःची कथा आहे हें विशेष व कौतुकास्पद. कथेच्या या सामूहिक वाटचालीचं सावट ठोमऱ्यांच्या कथांवर आढळत नाहीं. आणि त्याचमुळं या अर्ध्या चंद्रासारख्या नेत्रपल्लवीकडे रसिकांचं लक्ष जातंच. ही कथा जुनीहि नाहीं व नवीहि नाहीं. दोहोंच्या सीमारेषेवर ती उभी आहे तिला स्वतःचं रंगरूप आहे. इतकंच काय स्वतःच ती मशगूल आहे असं बऱ्याचदां वाटतं.' तरी ती प्रामाणिक आहे. स्वतःला, प्रत्ययकारी आहे रसिकाला

ठोमऱ्यांच्या कथांतून माणसं भेटतात ती सधन व्यक्तिमत्वाची









अनुक्रमणिका

## "धीमंत" धनवटे

**नागपूर** येथील 'शिवराज लिथो वर्क्स' चे धनी, उदारचरित दादासाहेब धनवटे यांचें गेल्या महिन्यांत देहावसान झालें. जे जीवन "जगले" त्यांना 'मृत्यु' खऱ्या अर्थानें मारूं शकत नाहीं. मरणालाही मारून जाण्याची किमया त्यांच्या 'जीवना' नें घडविली असते. माणूस केवळ श्रीमंत झाल्यानें मोठा ठरत नाहीं. तो मोठाच असावा लागतो. 'धीमंत' असावा लागतो. दादासाहेब धनवटे यांना लोक श्रीमंत म्हणून ओळखत होते. पण त्यांना धीमंत धनवटे असेंच म्हणावयाचें असलें पाहिजे असें आम्हांस वाटतें. धनवटे यांच्या कर्तृत्वांतून हें पद त्यांनीं संपादन केलें. ती कमाई त्यांची स्वत:ची होती. पण देऊनही जी कधीं संपली नाहीं. संपत नाहीं अशी ती कमाई होती. नागपूरला गेलांत तर विदर्भ साहित्य संघाची प्रचंड इमारत मन मोहवील. धनवटे नाट्यमंदिरांत डोकावून नाटक बघावेसे वाटेल. धनवटचांच्या प्रेसवरला छत्रपतींचा पुतळा पहायलाच हवा असें नागपूरकर मित्र तुम्हांला सांगतील. धनवटचांच्या कर्तृत्वाच्या आणि दातृत्वाच्या आणि मातृत्वाच्या कितीतरी कथा तुम्हांला ऐकायला मिळतील. त्यांच्या दातृत्वानें जीवनाच्या सर्वच क्षेत्रांतल्या मंडळींना साथ दिली आहे. आणि ते दानशूर ठरले आहेत. त्यांच्या मृत्यूनें अवघ्या महाराष्ट्राचीच हानी झाली आहे. त्यांच्या कुटुंबियांच्या दु:खांत 'दीपावली' सहभागी आहे. ईश्वर त्यांच्या आत्म्यास शांति देवो !

आपल्या मनांत ती विटाईनं शिरतात, वावर करूं लागतात. 'ऋणानुबंध' मधला बवनभाऊ, मोठ्या कृतज्ञतेनं मामाची रीत दाखवतो, 'आनंदी गेली'तील आनंदी घरच्याच माणसापरी चटका लावते, 'रेती पाठवून द्या'मधील 'मी' चा फसलेला फौजी ठेकेदारीचा धंदा आपल्या अनुभवाची कक्षा वाढवतो, 'मेंढी. . मेंढी..मेंढी' मधील वामनरावांचं 'जीत नव्हतीच, उलटही हार अशीच हात धुतल्यासारखी त्यांच्यामागें लागली होती' असं ओसाड जगणं आपल्या कृतकर्मांतहि पोकळी निर्माण करतं, दोस्त बावू पुर्नाळे आपलाहि दोस्त आहे असं वाटायला लागतं, 'आणि हें मात्र तुमचं' असं कामुक नि लाजरेपणानं म्हणणाऱ्या वत्सलेचा ओघळणारा पदर आपल्याला आपली शरम सावरायला लावतो, 'क्षमा-क्षमा' मधील चरित्रमान मिंतींचा विनदिल व्यवहारीपण, नाना कळांचा भीषणपणा मिस्टर ओकांच्या भवतालांतून आपल्याला जगाच्या चव्हाटचावरच्या व्यक्तिमत्वाची ओळख पटवतो. असं आहे हें ठोमऱ्यांचं व्यक्तिविश्व. त्या व्यक्तिविश्वाला स्वत:ची झेंप आहे आणि स्वत:च्या मर्यादाहि आहेत तरी त्या मर्यादांचं त्या झेपेला ओझं झालेलं नाहीं हें ठोमऱ्यांच्या खुद्द लेखणीचं सामर्थ्य.

सघन व्यक्तिविश्वाच्या जोडीला ठोमऱ्यांच्या कथांतून प्रत्ययाला येतो तो रंगमंच. वांवेसूदपणानं हा रंगमंच प्रत्येक कथेंत निर्माण झाला आहे. रंगमंच म्हटला म्हणजे नाटक आलंच आणि नाटक म्हणजे पायरी पायरीनं चढउतार घेऊन अपेक्षित उत्तर देणारं गणित. कथेंत ठराविक पायरीवर ठराविक व्यक्तींचं येणंजाणं, ठराविक घटनेचं घडणं न घडणं हें कमालीच्या सफाईनं, चपखल संवेदी शब्दांच्या निवडीनं जमतं. त्यामुळं कथा 'पोझ' घेतल्यासारखी वाटते; पण नाट्य कायम राहिल्यानं नाटकी वाटत नाहीं.

ठोमऱ्यांच्या लेखणीला इंग्रजी शब्दांचा उदंड हव्यास आहे, कलाटणीचीसुद्धां गति आहे. पण मुलायम लिहिणारी त्यांची लेखणी नको तिथें दांडग्या दुंडग्या शब्दांचा गडगा कां रचते? (पान ५३) असं अनेक ठिकाणीं आढळतं. आणि कांहीं ठिकाणीं तर चक्क 'अवर्णनीय' असा शेरा मारून ठोमरे स्वस्थ होतात. याचा वचपा काढण्यासाठीं कीं काय कथेला 'कुळंबीण'मध्यें लांबी न देतां लांबड देतात, 'वत्सला'मधें इंग्रजींत खुलासा करतात. वास्तवतेची त्यांनी बूज राखलीआहे. त्याचप्रमाणं आयुष्यांतल्या मंगल मूल्यांची जपणूक केली आहे. नकळत हेतूप्रधानतेचा कथेला वास येतो. तरी तो पुसट ठरतो. येतो न येतो बोंच तो मागची कलात्मकतेची पाकळी दाखवतो.

कुठल्याहि माध्यमांतली कलाकृति गुणदोषांनी मिश्र असते याला ठोमऱ्यांची कथा अपवाद नाहीं; पण आयुष्यांतल्या अनेक-पेडी अनुभूतीचें आव्हान ती स्वीकारते हें मोलाचे वाटते.

**–दत्ता कदम**

(**नेत्रपल्लवी** (कथासंग्रह) **लेखक**: उमाकांत ठोमरे **प्रकाशक**: पुं. ना. देशमुख, नागविदर्भ प्रकाशन, राजकमल चौक, अमरावती. **पृष्ठें** १२७ **मूल्य**: ४ रुपये. ) • •

## भावनेला गेलेला तडा

**नवकथालेखिकेच्या** वीस कथांचा हा संग्रह आहे. 'धपापणाऱ्या उरांनी लिहिणाऱ्या लेखिकांत या लेखिकेचा एक श्रेष्ठ नवकथाकारांनी समावेश केला आहे. त्यांनी दिलेले बिरुद अगदी यथार्थ आहे. यांतल्या प्रत्येक कथेतील नायक आणि नायिकांच्या हृदयांचे भाते लोहाराच्या भात्यासारखे वाजताहेत. अंतर्मनांतील आवर्त, भावगीतेंतील खोल खोल स्पंदनें, शब्दांत पकडण्याच्या हव्यासांत लेखिकेच्या कथांना, आकारच उरलेला नाहीं. त्यांतील पात्रांना शरीर नाहीं, चेहरा नाहीं, की वजन नाही. विषयांत वैचित्र्य नाहीं, की आशयांत अनुभूतीची समृद्धि नाहीं. नायक वा नायिका एकमेकांकडे आवेगाने धावतात हिरमुसतात, खिन्न होतात, पुन्हा आशाळभूत होऊन शुष्क संवाद बडबडतात.

भाषा देखील इतकी नीरस आणि रुक्ष आहे कीं वाचकाच्या सहनशक्तीचा कडेलोटच व्हावा. 'वाचनीयता' हा पूर्वी ललित साहित्याचा किमान गुण मानला जात होता. आतां 'अवाचनीयता' हा साहित्यांतील श्रेष्ठतेचा मानदंड आहे अशी तर लेखिकेची कुणी समजूत करून दिली नसेल ना अशी शंका मनाला चाटून जाते.

**—श्रीपाद भागवत**

(**पश्चिम कडा : लेखिका**– तारा वनारसे **प्रकाशक** – मौज प्रकाशन गृह, मुंबई ४ ) • • •


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



